# लेखकाची अध्यात्मिकता आणि दर्शनता

मराठी भाषेचा विचार केल्यानंतर आपणास नेमाडेंच्या 'आदिलेखक', 'लेखकाची नैतिकता', 'लेखकाची सामाजिक बांधिलकी' आणि 'साहित्यातील आधुनिकता' ह्या चार संकल्पनांचा नीट विचार करता येईल. नेमाडेंचा सर्व विचार हा समाजलक्ष्यी असल्याने या चारीही संकल्पना समाजाशी निगडित आहेत. ह्याखेरीज मराठीतील काही अपप्रवृत्तींवर त्यांनी हल्ला चढवला आहे. 'निरस्तपादपे देशे' या लेखातील क्षीरसागरांसारख्यांच्या पोपटपंची समीक्षेवर नेमाडेंनी केलेला हल्ला हा अचूक आणि धारदार आहे. कुठलाही सुबुद्ध माणूस त्यांच्याशी याबाबत सहमत होईल, त्याचबरोबर वारकरी चळवळीवरचे त्यांचे भाष्य पटण्याजोगे आहे. जेथे माझे मतभेद होते ते मी ह्यापूर्वीच्या प्रकरणात नोंदवले आहेत. 'हल्ली लेखकाचा लेखकराव का होतो ?' या लेखात त्यांनी मराठीतील बाजारू व्यवस्थेवर चढवलेला हल्ला अचूक शरसंधान करणारा आहे. याचवेळी नेमाडेंनी आदि लेखकाची संकल्पना मांडलेली आहे. नेमाडेंनी आदिलेखक म्हणजे काय हे न सांगताच ही संकल्पना या लेखात राबवलेली आहे. मात्र त्यांच्या संकल्पनेतून सर्वसाधारणपणे तीन प्रश्नांची उत्तरे त्यांनी दिलेली दिसतात.

**(१) लेखक कसा असावा ? (२) लेखन कसे असावे ? (३) लेखनात काय असावे ?**

लेखक कसा असावा ह्या प्रश्नाचे नेमाडेंनी दिलेले उत्तर **बाणेदार** आणि **नि:स्पृह** असे आहे. *त्याने जगणे आणि लिहिणे ह्यात फरक करू नये. त्याला मिळालेले लेखनस्वातंत्र्य हे विरोधी लिहू शकण्यासाठी आणि आक्रमक विचारसंहिता देण्यासाठी असते हे त्याने ध्यानात घेऊन लिखाण करावे. त्याने आपल्या जाणिवांशी प्रामाणिक असावे. त्याने सुखलोलुपतेच्या मागे धावू नये. दुःखांना निर्भयपणे सामोरे जावे आणि ही दुःखे त्याने साहित्यात मांडावीत. त्याने इतर नागरिकांप्रमाणे स्वार्थी असू नये. कोणतेही लेखन हे लेखकाच्या व्यक्तिमत्त्वावर अवलंबून असते आणि भौतिक विकास व्यक्तिमत्त्व पोखरत जातो. लेखकांनी राजकीय सत्तेपासून फटकून रहावे. साहित्याचे मोठेपण लेखकाच्या व्यक्तिमत्त्वावर सिद्ध होते. पुस्तकाचे मोठेपण निव्वळ पुस्तकांवर ठरत नाही आणि हे व्यक्तिमत्त्व पैशाला व मानमान्यतेला मोठे समजणाऱ्या समाजात टिकवणे हे व्रत असते, व्रत आहे. थोडक्यात, लेखकाने* ***'अस्सल'*** *असावे. पैसा, प्रतिष्ठा, सुख यांच्या मागे लागू नये.*

लेखन कसे असावे ह्याचे उत्तर **लेखकाचे सबंध अस्तित्व उमटलेले** असे नेमाडेंनी

दिले आहे. आज साहित्य हा एक धंदा होऊन बसला आहे. स्टॅंडर्ड ऑफ लीव्हिंगच्या व पैशाच्या भौतिक विलासाच्या मागे लेखक ही जमात लागल्याने साहित्य लिहिणे हा एक धंदा झाला आहे आणि मराठीतील तेजस्वी लेखक ह्या धंदेबाजीत सापडले आहेत. त्यामुळेच लेखक आपले ब्रीद घालवून बसले आहेत आणि त्यातून रद्दी लेखन निर्माण होत आहे. त्यातून साहित्यिकांत स्पर्धा, मारामाऱ्या, गटबाजी, गटबाजीतून एकमेकाला सांभाळणे, वर चढवणे अशा गोष्टी चालू आहेत आणि त्यातून लेखक म्हणजे गिधाड आणि साहित्य म्हणजे मेलेले जनावर अशी परिस्थिती उद्‌भवली आहे. प्रत्यक्षात साहित्याचे अवतारकार्य वेगळेच आहे. ती एक सांस्कृतिक जबाबदारी आहे. ती खाजगी मालमत्तेसारखी बाब नव्हे. कोणतेही लेखन लेखकाच्या दुःखाच्या किंवा सुखाच्या किंवा दुसऱ्या अनेक प्रकारच्या राकट अनुभवांवर उभे असते. त्याची प्रचीती आपल्याला त्याच्या ग्रंथावरून येते. सर्व अनुभवांची जाणीव ह्या लेखातून येते आणि त्यातून येणाऱ्या दुःखानुभवावरच त्याचे मोठेपण अवलंबून असते.

लेखकाचे मोठेपण लेखकाच्या अनुभव-संपत्तीवर आणि लिहितालिहिताच्या प्रामाणिकपणावर अवलंबून आहे. लेखक जेव्हा आदिलेखक होतो (पूर्वी लेखक कसा असावा ते सांगितले आहे तसा होतो) तेव्हाच अलीकडे चांगली कलाकृती निर्माण होते. लेखकाच्या लेखनात काय असते ? तर त्याचे हे संपूर्ण अनुभवविश्व आणि संपूर्ण अस्तित्व असते. म्हणून नेमाडे जाणिवेची मूल्ये आणि वाङ्मयीन मूल्ये वेगळी काढू इच्छित नाहीत. जीवनाचे व सृष्टीचे रौद्र स्वरूप हे लेखकाने साक्षात अनुभवावे आणि तेच लेखनात उमटावे अशी नेमाडेंची अपेक्षा आहे.

नेमाडेंचे हे सर्व विवेचन वाचताना आपल्या संतांच्या शिकणुकीचे पडसाद त्यात आढळतात.

जितेनी मृतांच्या धर्मी वर्तावे- संत चक्रधर

बोले तैसा चाले त्याची वंदावी पाऊले- संत तुकाराम

धन्य कळवळ्याची जाती लाभेविण करे प्रिती- संत तुकाराम

भले तरी देऊ गांडीची लंगोटी

नाठाळाचे काठी माथी हाणू - संत तुकाराम

नेमाडेंचा **विठ्ठल** मात्र आध्यात्मिक नसून **सामाजिक** आहे आणि ह्या विठ्ठलासाठी तळमळणारा संत म्हणजे लेखक अशी नेमाडेंची नम्र धारणा आहे. नेमाडेंच्या विचाराशी कोणी अस्सल लेखक मतभेद दर्शवील असे वाटत नाही; पण तरीही काही ठिकाणी मतभेद नोंदवावेसे

वाटतात.

मी मागेच म्हटल्याप्रमाणे मोक्ष म्हणजे स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाला संपूर्ण उपलब्ध होणे, ह्याच पार्श्वभूमीवर मी म्हणेन, प्रेम म्हणजे दुसऱ्याच्या व्यक्तिमत्त्वाला संपूर्ण उपलब्ध होणे. 'हे जे दुसरे असेल ते कलावंताबाबत 'कला', 'भांडवलदाराबाबत 'उद्योगधंदा', राजकारण्याबाबत 'सत्ता' असते. दुर्दैवाने आज अशी माणसे जवळजवळ गायब झालेली दिसतात. पूर्वीही ती फारशी नव्हती. ह्याच पार्श्वभूमीवर असेही म्हणता येईल, कलाकृती म्हणजे जीवनाला संपूर्ण उपलब्ध होणे. कुठलीही कलाकृती म्हणजे कलावंताने साधलेला कलात्मक मोक्ष होय. हा मोक्ष अवकाश आणि काळ यांनी बद्ध असतो आणि तो मोक्ष असल्याने काळ आणि अवकाश ह्यांना ओलांडून पुढे झेपही घेतो. कलावंताला ह्या मोक्षासाठी, ह्या निर्वाणासाठी अष्टांगमार्ग अनुसरावा लागतो.

**(१) सम्यक् दृष्टी :** जगात दुःखं आहे आणि ते भरपूर व सार्वत्रिक आहे. जगात थोडे का होईना पण सुखही आहे. प्रत्येक सुख आणखी सुखाची अपेक्षा निर्माण करते. सुखाविषयीची ही तृष्णा सरतेशेवटी दुःखच निर्माण करते. जगातील सर्व सुख-दुःखांसाठी **अविद्या** हे कारक आहे. ह्या अविद्येतून तृष्णा व तृष्णेतून सुख वा दुःख निर्माण होते. प्रत्येक सुख हे सुखाची तृष्णा आणखी वाढवते आणि शेवटी मानवाला दुःखाप्रतच आणून सोडते. ह्या दुःखाचा आणि तृष्णेचा नाश होऊ शकतो. ह्यासाठी माणसांना मोक्षाचा, निर्वाणीचा, मुक्तीचा मार्ग अनुसरावा लागतो. पण मोक्षाची तृष्णा ही तृष्णाच. ती नाहीशी होत नाही तोपर्यंत मोक्ष मिळत नाही. ह्या सत्त्यांची पूर्ण जाणीव कलावंताला हवी. ही जाणीव म्हणजेच सम्यक् दृष्टी होय. प्रत्येक सुख वा दुःख हे भावपूर्ण असते. कधी ते एकाच भावाने, कधी अनेक भावाने ते युक्त असते. त्याचे समग्र आकलन म्हणजे सम्यक् दृष्टी होय.

**(२) सम्यक् संकल्प :** सम्यक् संकल्प म्हणजे **शुभ** आकांक्षा, शुभकामना, सुख-दुःखांविषयी निर्लिप्त वृत्ती. सर्व भूतांविषयी अद्वेष व दुसऱ्यास पीडा न देणे होय. जगातल्या प्रत्येक मानवाविषयी व मानवेतराविषयी आस्था व त्यांच्या शुभपणाची कामना ही कलावंतास असायला हवी.

**(३) सम्यक् वाचा :** खोटे बोलणे आणि व्यर्थ बडबड यापासून परावृत्त असावे. कलावंताने कधीही कलाकृती निर्माण करताना आणि प्रत्यक्ष कलाकृतीत खोटे बोलू नये. कलाकृतीत कधीच व्यर्थ बडबड किंवा व्यर्थ आशय असू नये. **खोटा आशय** हा नेहमीच कलाकृतीला मारक ठरतो. अनेकदा कलावंत खोटा आशय सजवून मांडतो आणि तो खरा असल्याचे भासवतो. कलावंताने हे टाळले पाहिजे, त्याचबरोबर व्यर्थ आशयही त्याने निर्माण करू नये.

**(४) सम्यक् कर्म :** कलावंताने दुसऱ्याची कलाकृती ठार मारू नये, गटबाजी करू नये. दुसऱ्याच्या कलाकृतीची चोरी करू नये. ह्यासाठी चोरीस प्रवृत्त करणाऱ्या तृष्णेला संयम हवा. महात्त्वाकांक्षा, पैसा ह्यामागे धावू नये.

**(५) सम्यक् उपजीविका :** कलावंताने आपली उपजीविका योग्य मार्गानेच करावी. **स्वतः हसे गोळा करायचे आणि कवितेतून समग्र क्रांतीची घोषणा करायची,** स्वतः राजकारण खेळून बक्षिसे मिळवायची आणि कमिट्यांत वर्णी लावायची आणि कलाकृतीत नैतिकतेचा उपदेश द्यायचा असा दुटप्पीपणा कलावंताने करू नये. योग्य तेवढेच मानधन घ्यावे.

**(६) सम्यक् व्यायाम :** कलावंताने दुर्विचार काढून सतत शुभविचारासाठी प्रयत्नशील राहावे. ह्याचबरोबर कलाकृती चांगली व्हावी यासाठी वाचन, चिंतन, मनन यांचा रियाझ करावा. आविष्कारासाठी सतत तंत्राचा व्यायाम करणे आवश्यक आहे.

**(७) सम्यक् स्मृती :** कलावंताने सर्व क्षणिक आहे, सर्वच नाहीसे होणारे आहे याचे भान ठेवावे. स्वतः कलावंत आणि कलाकृती या दोन्ही क्षणिक असून त्या सरतेशेवटी नाहीशाच होणार आहेत याचे भान ठेवावे. उगाच अमर, अक्षर कलाकृतींच्या मागे लागू नये. ह्या जगात अक्षर, अमर काही नसते ह्याचे भान असावे. मी अक्षर कलाकृती निर्माण करतो म्हणून कुठलीही कलाकृती अक्षर होत नाही. एखादी कलाकृती दीर्घकाळ टिकू शकते; पण सरतेशेवटी ती नाहीशीच होणार असते आणि अशा कलाकृतीची निर्मिती हा अपघात असतो ह्याचे भान ठेवावे.

**(८) सम्यक् समाधी :** वरील मार्गाची परिणीती म्हणजे कलात्मक समाधी. तिच्यातून चित्तास परमशांती व परमआनंद प्राप्त होतो. कलाकृतीच्या निर्मितीतून मिळणारा हा अत्यानंद, ही आत्मशांती हेच कलावंताचे खरे श्रेयस होय. बाकी सर्व गोष्टी फिजूल होत.

वरील अष्टांग मार्गासाठी जो कलावंत धडपडतो, अनुसरतो, तो खरा आध्यात्मिक कलावंत होय. नेमाडे साहित्यिकाला दुःखाला भिडायला सांगतात. मला वाटते, कोणत्याही कलावंताने आध्यात्मिक कलावंत म्हणून जगायला सुरुवात केली की त्याच्या वाट्याला कष्ट, दुःख, यातना येतातच. ह्या सुखदुःखाकडे जो **स्थितप्रज्ञेने** पहातो तो खरा कलावंत होय. नेमाडे म्हणतात तसे भौतिक सुख नव्हे, तर भौतिक सुखाची तृष्णा कलावंताला पोखरत जाते. नेमाडे काय किंवा इतर देशीवादी लेखक काय, सर्वचजण भौतिक विकासाला आणि सुखाला नावे ठेवताना दिसतात. कारण या सर्वांची मुळे भक्ती चळवळीत रुजलेली आहेत आणि भक्ती चळवळीने सातत्याने सुखाचा, देहसुखाचा निषेध केला आहे. त्याचा सखोल परिणाम ह्या सर्वांवर झाल्याचे जाणवते. म्हणून वरील वैश्य जाणिवेला हे लोक चंगळवाद म्हणून हिणवतात. मला वाटते, हीही भूमिका

तितकीच चुकीची आहे. भौतिक सुख की मानसिक दुःख ह्यापेक्षा दोघांपासून अलिप्त राहणारी, सम्यक् राहणारी प्रज्ञा महत्त्वाची असते. कृष्ण काय किंवा कृष्णमूर्ती काय रथातून अथवा गाडीतून हिंडतानाही सम्यक् असतात. आनंदात असतात, तर मुंबईच्या फुटपाथावरचा भिकारी तुकारामपेक्षा अधिक दुःख भोगतो; पण त्याचा संत होत नाही. तेव्हा संत होण्यासाठी **दुःखोपभोग** हवा असे म्हणणे एका अर्थाने दुःखाविषयीची तृष्णाच दाखवते. तृष्णेचा निरास महत्त्वाचा. प्रतिष्ठेची, पैशाची, सुरक्षिततेची तृष्णा हीच आजच्या कलावंताच्या नासाडीला कारणीभूत आहे. भौतिक विकासाचा त्याच्याशी काहीही संबंध नाही. ह्याबाबत संत कबीर व त्याचा मुलगा ह्यांचा एक किस्सा सांगावासा वाटतो.

संत कबीराने नेहमीच भौतिक सुखाच्या मागे लागू नये असे सांगितले. कबीर स्वतःजवळ सोने, हिरे कधीच बाळगत नसे. त्याचा मुलगा मात्र थोडा वेगळा होता. हा मुलगाही शेवटी मोक्षाला उपलब्ध झाला. एक दिवस त्याच्याकडे एक सम्राट आला आणि त्याने त्याची परीक्षा घेण्यासाठी म्हणून त्याला एक हिरा दिला आणि म्हणाला, 'महाराज, हा हिरा तुमच्याजवळ ठेवून घ्या." राजाची अपेक्षा अशी की, संत माणूस म्हटल्यावर हा हिरा नाकारला जाईल; पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे मुलाने हिरा नाकारला नाही. तो ठेवून घेतला. राजा मनात थोडा खट्टू झाला आणि निघून गेला. बरेच दिवस गेले. राजा पुन्हा काही कामासाठी कबीरपुत्राच्या वसतिस्थानापाशी आला. त्याला स्वतःच्या हिऱ्याची आठवण झाली आणि त्याने सहज कबीरपुत्राला विचारले, "महाराज, तो हिरा आहे ना ?" कबीरपुत्र म्हणाला, "हिरा ना ? आहे." त्याने तो हिरा कोपऱ्यात कुठेतरी ठेवला होता. तो शोधला आणि राजाला परत दिला. राजाला आश्चर्य वाटले. कारण कबीरपुत्राच्या हालचालीवरून त्याला त्या हिऱ्याविषयी फार काही आस्था होती असे वाटेना. राजाने विचारले, "महाराज, आपण तो हिरा गळ्यात घालाल किंवा बोटात घालाल असे वाटले होते; पण आपण काहीच केले नाहीत. मग आपण तो घेतलात का ?" कबीरपुत्र म्हणाला, "बाबारे, तू हिरा दिलास. मी घेतला. तू शिव्या दिल्या असत्यास तरी त्याही घेतल्या असत्या. मला काय ? हिरा काय, दगड काय, स्तुती काय, शिव्या काय, सगळे सारखेच. जरी मी हिऱ्याला हिरा मानले असते तर मी हिरा नाकारला असता. कारण **एखादी वस्तू नाकारणे हाही तिच्या स्वीकारण्याचाच भाग असतो."** कबीरला जेव्हा हे कळाले तेव्हा कबीर म्हणाला, **"माझा मुलगा खरोखरच उपलब्ध झाला"**

तेव्हा भौतिक विकास महत्त्वाचा नाही. भौतिक विकासाच्या तृष्णेपासून मुक्ती ही महत्त्वाची. आज प्रवासासाठी विमान वापरावे लागते. ह्याचा अर्थ विमान वाईट नाही. विमान-प्रवासाची

तृष्णा वाईट होय. लेखक भयापासून मुक्त असणे महत्त्वाचे आहे. तो तसा असला की प्रामाणिक असतोच आणि ही प्रामाणिकता त्याला आपोआपच नि:स्पृह आणि समाजव्यवस्थेतील अपप्रवृत्तीविरुद्ध लढणारी बनवते. लेखकाने राजकीय सत्तेपासून फटकून असू नये तर **त्यापासून मुक्त असावे.** ही राजकीय सत्ता जर मानवाला मोक्षापासून दूर ठेवत असेल, त्याच्या व्यक्तिमत्त्वाला संपूर्ण उपलब्ध होण्यापासून रोखत असेल तर वेळप्रसंगी लेखकाने वा कलावंताने राजकारणात पडले पाहिजे किंवा त्या राजकारणाचे स्वरूप चव्हाट्यावर मांडले पाहिजे. आज बरेच कलावंत महत्त्वाकांक्षा, लोकप्रियता, पैसा, सुरक्षितता, बंगला आणि गाडी यांच्या तृष्णेत सापडून स्वतःचे ब्रीद विसरलेले दिसतात. त्यामुळेच आज महान कलाकृती निर्माण करण्यात मराठी कलावंत अपयशी असलेले दिसतात. त्यामागे एक गोष्ट आणखी आहे, ती म्हणजे लेखकाला मिळणारे अल्प मानधन. आज पाश्चात्त्य देशात कलावंताला स्वतःचे ब्रीद न सोडता तो जे काही निर्माण करतो त्याचे पुरेसे पैसे मिळतात. त्याउलट भारतीय कलावंतांना इथल्या आर्थिक दारिद्र्यामुळे आणि कलेविषियी इथे प्रचंड अनास्था असल्याने एक-दोन कलाकृती निर्माण करून भागत नाही. परिणामी कलावंत बाजार मांडतात. नाटक आणि चित्रपटाला लागणारे भांडवल इतके प्रचंड असते की ह्या कला कला न राहता केवळ धंदा बनून गेल्या आहेत. प्राचीन काळीही कलावंत धंदाच करत असत. **धर्मसंस्था व राजसंस्थेच्या** आक्रमणाखाली गाजणारे हे कलावंत ह्या संस्थांना खूश करण्यासाठी त्यांना हवे तसे लिहीत किंवा निर्माण करत. वैश्य जाणिवेच्या प्रभावाखाली जग येताच ह्या दोन्ही संस्था आश्रयकर्त्या म्हणून सुटल्या आणि कलावंतांना लोकाश्रयावर अवलंबून राहावे लागले. पूर्वीही अनेक आदिम लोकसंस्कृतीतील कलावंत हे त्या संस्कृतीच्या कथांना, मूल्यांना गोंजारत होते, असतात. हाही खरेतर मागणी तसा पुरवठा ह्या तत्त्वावर चालणारा त्या त्या संस्कृतीने आखून दिलेल्या नीतिमत्तांना गोंजारणारा धंदाच होता आणि आहे. होमर व्यासाच्या काळात भाट होतेच. थोडक्यात, ज्याला नेमाडे अदिलेखक म्हणतात ती जमात पूर्वी अस्तित्वात होती आणि भांडवलशाहीच्या युगात ती नष्ट झाली असे समजण्याचे कारण नाही. नेमाडेंच्यावर मार्क्सवादी प्रभाव असल्याने ते मार्क्सवाद्यांच्या भांडवलशाहीत कलाकृती क्रयवस्तू बनते व त्यामागे भांडवली हितसंबंध असतात ह्या गृहीतकला कवटाळतात. प्रत्यक्षात जगात फार पूर्वीपासून मागणी तसा पुरवठा हे तत्त्व आहे. अलीकडे साधने व मागणी वाढली इतकेच. पूर्वी भौतिक सुखाची साधने कमी होती आणि कलावंत त्या काळीही ह्या साधनांच्या मागे होताच. राजनर्तिका, राजकवी, राजगायक हे सगळे भौतिक सुखाच्या साधनांच्या मागेच होते. तेव्हा नेमाडेंनी **अलीकडच्या** लेखकांनाच वेठीस धरले आहे ते योग्य नव्हे. ह्या जगात

पूर्वीही '**आध्यात्मिक लेखक**' कमीच होते आणि आताही कमी आहेत. किंबहुना मी तर असे म्हणेन की, सर्वच क्षेत्रात असे आध्यात्मिक लोक कमी आहेत आणि आध्यात्माच्या गप्पा मारणाऱ्या भारत नामक देशात तर ते सर्वात कमी आहेत. आध्यात्मिक पातळीवर सध्या तरी भारताइतका दिवाळखोर देश नसावा. एकीकडे आध्यात्मिक पातळीवर दिवाळखोरी तर दुसरीकडे भौतिक संपन्नतेसाठी जे कष्ट व सृजन करावे लागते ते कष्ट व सृजन करण्याबाबतीत असलेला प्रचंड आळशीपणा व हेळसांड अशा दोन्ही बाजूंनी हा देश आज मार खात आहे. कलाक्षेत्र ह्याला अपवाद नाही. आपल्या व्यावसायिक कलाकृती आणि पाश्चात्त्य व्यावसायिक कलाकृती ह्यांच्या दर्जातील फरक ह्याबाबतीतली वस्तुस्थिती स्पष्ट दाखवतो. आमच्या व्यावसायिक कलाकृती, मग त्या चित्रपट असोत, नाहीतर कादंबऱ्या, ही पाश्चात्त्यांची उसनवारी आणि चोरी असते. थोडक्यात, नेमाडे ज्या धंदेबाजीविरुद्ध ओरड करतात ती धंदेबाजीदेखील आम्ही प्रामाणिकपणे करीत नाही. परिस्थितीवर मात करायची असेल तर सर्वच क्षेत्रात आध्यात्मिक माणसे निर्माण व्हायला हवीत. मराठी साहित्यात अशा आध्यात्मिक लेखकांची टोळकी तयार व्हायला हवीत. खुद्द नेमाडे, चित्रे हे अशा प्रवृत्तीचे आध्यात्मिक लेखक आहेत. ते मराठीत लिहितात हे आपले परमभाग्यच आहे आणि आपण त्याबाबत त्यांचे ऋणीच राहायला हवे.

आध्यात्मिक लेखकाच्या वाट्याला जगात सर्वत्र प्रचंड दुःख येते, पण त्याचबरोबर सुखही वाट्याला येते. लेखकाने नेमाडे सुचवतात तसे दुःख शोधत जाण्याची गरज नाही. जगात दुःखाची वानवा निर्माण व्हावी एवढी अजून सुखाने दाटीवाटी केलेली नाही. तेव्हा दुःख वाट्याला येईलच. मात्र लेखकाने ह्या दुःखापासून पळून जाऊ नये. ह्या पलायनातून लेखक आपले सत्त्व गमावत जातो. लेखकाने ह्या दुःखाचा स्वीकार सुखाइतकाच मनःपूर्वक करावा. फक्त दुःखावर भर देऊ नये. तीही विकृतीच होय. सर्वत्र दुःख आहे असे म्हणणारा बुद्ध चाळीस वर्षे परमशांती आणि परम आनंदात राहात जगला. 'सुख पाहता जवाएवढी, दुःख पर्वताएवढे' म्हणणारा तुकाराम '**आनंदाचे डोही आनंद तरंग**' असेही लिहून गेला हे आपण लक्षात घेतले पाहिजे.

आध्यात्मिक लेखक का लिहितो ? हा आध्यात्मिक कलावंत कलाकृती निर्माण का करतो ? 'बुडते हे जन देखे न डोळा म्हणून कळवळा' असे तुकारामांनी म्हणून ठेवले आहेच. एखादा माणूस मोक्षाला उपलब्ध होतो; पण तो तिथेच थांबत नाही. जे आपणाला प्राप्त झाले ते इतरांनाही मिळावे असा कळवळा त्याच्या ठायी निर्माण होतो. म्हणून मग तो लोकांची अविद्या दूर करण्यासाठी लोकांना उपदेश करतो. कलावंत हाही असाच असतो. तो जीवनानुभवाला संपूर्ण उपलब्ध होतो, पण त्यानंतर हा अनुभव इतरांनाही मिळावा असे त्याला वाटते. म्हणून तो लिहितो. कलाकृती

निर्मितो. ही प्रक्रिया फुलासारखी असते. फुलाला स्वतःचा सुगंध उपलब्ध झाल्यानंतर फूल तो सुगंध आपल्याजवळ ठेवत नाही, तर आसमंतात वाटून टाकते. हे अगदी सहज घडते. ह्या आसमंतात कोणी आहे की नाही ह्याची फुलाला फिकीर असत नाही. तसेच कलावंताच्या सुमनात अनुभवाचा सुगंध दरवळला की कलावंत तो माध्यमातून वाटून टाकतो. कुणी भाषेतून वाटतो, कुणी ध्वनीतून वाटतो. इतर लोक तो घेतात की नाही, घेतला तर किती घेतात ह्याची फिकीर तो करत नाही. तो वाटण्यात त्याचा आनंद असतो. लोकांची अविद्या दूर करणे हा संतांचा आनंद असतो, तसेच कलावंताचेही असते. लोकांचा जीवनानुभव समृद्ध करणे हा त्याचा आनंद असतो. लोकांच्या डोक्यात जीवनानुभवाचा प्रकाश पडावा म्हणून तो धडपडतो; पण लोकांच्या डोक्यात हा प्रकाश पाडण्यासाठी खुद्द लेखकाच्या डोक्यात हा प्रकाश पडावा लागतो. मराठीतील अनेक लेखकांच्या डोक्यात हा प्रकाश पडलाय असे त्यांच्या लेखनावरून वाटत नाही. हे लोक कधी शेक्सपिअरच्या डोक्यातला तर कधी कामू, सार्त्र, काफ्काच्या डोक्यातला प्रकाश उसना घेतात आणि लोकांच्या डोक्यात प्रकाश पाडायला निघतात. परिणामी ह्यांचे लेखन सत्व गमावून बसते. ब्रिटिश रोमॅण्टिक कवीच्या डोक्यातला प्रकाश उसना घेऊन केशवसुत तर टी. एस. इलियटच्या डोक्यातला प्रकाश उसना घेऊन मर्ढेकर इथे क्रांतिकारक ठरतात. ह्यांची कामगिरी एवढीच की ह्यांनी युरोपियन सेल प्रथम शोधले आणि मराठी भाषेच्या बॅटरीत ते प्रथम बसविले.

**नेमाडे यांच्या मते लेखनाचा दर्जा हा लेखकाच्या व्यक्तिमत्त्वावर अवलंबून असतो.** मला व्यक्तिशः इथे कहीतरी गफलत झालीये असे वाटते. लेखनाचा दर्जा केवळ लेखकाच्या व्यक्तिमत्त्वावर अवलंबून नसतो.त्यांच्या आविष्कार-कौशल्यावरही अवलंबून असतो.

बुद्धाने ज्यांना निर्वाण प्राप्त होते अशा लोकांचे दोन प्रकार केले होते. **(१) बुद्ध (२) अर्हत.** ह्यातील जे अर्हत असतात ते त्यांना निर्वाण प्राप्त झाल्यावरही बोलू शकत नाहीत. ते लोकांना मार्ग दाखविण्यासाठी लोकांच्यात येत नाहीत, तर बुद्ध मात्र लोकांना मार्गदर्शन करतो. त्यांना निर्वाणासाठी उद्युक्त करतो. वास्तविक इथे दोघेही निर्वाणपदी पोहोचलेले असतात; पण अर्हताजवळ आविष्कार क्षमता नसल्याने त्याला बुद्ध होता येत नाही. लेखनाबाबतही हेच घडते. अनेकांना जीवनाचा साक्षात्कार होतो; सर्वांनाच लेखक होता येत नाही. सर्वांच्याजवळ ही लेखकाला लागणारी आविष्कार-कौशल्ये असतातच असे नाही. सर्वांच्याजवळ ती सारख्याच प्रमाणात असतात असेही नाही. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ता ह्या चारी भावंडांना निर्वाणप्राप्ती झाली तरी आविष्कार-कौशल्याबाबत ज्ञानेश्वर अधिक श्रेष्ठ असल्याने त्यांचे लेखन श्रेष्ठ ठरले, ह्याचा अर्थ सर्वच कौशल्य असणारे लोक ज्ञानेश्वरी लिहितील काय ? तर त्याचेही

उत्तर ठामपणे नाही असे आहे. लेखनात लेखकाचे संपूर्ण व्यक्तिमत्त्व प्रकटत असल्याने लेखन श्रेष्ठ होण्यासाठी लेखकाचे व्यक्तिमत्त्व श्रेष्ठ असणे ही आद्य अट आहे. थोडक्यात, सर्वच श्रेष्ठ व्यक्तिमत्त्वे श्रेष्ठ लेखन करतातच असे नाही; पण जगातले श्रेष्ठ लेखन हे फक्त श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व असलेल्या लेखकांनीच निर्माण केले आहे. व्यक्तिमत्त्वाचा कणा नसलेले लेखक कलावादाची भोंगळ भूमिका गोंजारत गोंजारत पुचाट साहित्यनिर्मिती करत राहतात ह्याला फारसा अर्थ नसतो. हे इथे विस्ताराने सांगण्याचे कारण म्हणजे नेमाडेंनी व्यक्तिमत्त्वावर अतिरेकी भर देऊन साने गुरुजीसारख्या लेखकांना अकारण उंच बसवण्याचा प्रयत्न केला आहे. साने गुरुजी हे चांगले लेखक आहेत; पण ज्याला श्रेष्ठ म्हणता येईल असे त्यांच्या लेखनात काही नाही. भाऊ पाध्येंबाबत अशीच गफलत झालेली दिसते.

लेखक स्वतःचे व्यक्तिमत्त्व आपल्या लेखनात उमटवत असतो हे कुणीही मान्य करेल. दिलीप चित्रेंनीही त्यांच्या समीक्षेत कविता म्हणजे आत्मचरित्र असते असे मत मानले आहे. प्रश्न इतकाच आहे की, लेखक केवळ त्याला वैयक्तिक आयुष्यात आलेले अनुभवच व्यक्त करू शकतो काय ? तेवढेच अनुभव त्याच्या लेखनात अस्सल उतरतात का ? नेमाडेंच्या समीक्षेचा सूर तरी तसाच लागतो. त्यांच्या कादंबऱ्याही आत्मचरित्रात्मक आहेत. चित्रेंच्या कविता म्हणजे त्यांचे आत्मचरित्रच आहे. मला वाटते लेखक त्याच्या अवकाशातील बऱ्याच अनुभवांना आपल्या अस्तित्वात मुरवून आपले अस्तित्व विशाल करू शकतो. माणूस भोवतालचा अवकाश जसा मुरवत असतो तसाच त्या अवकाशातील माणसांचा जीवनानुभवही मुरवत असतो. हा अनुभव आत्मानुभव नसतो; मात्र तो निश्चितपणे अस्तित्वानुभव असतो. ह्या अस्तित्वानुभवातूनच वॉर ॲण्ड पीससारखी कादंबरी शक्य होते. टॉलस्टॉयने भूतकालीन रशिया आपल्या अस्तित्वानुभवात जिरवला आणि त्यातून ही कादंबरी जन्मली. मराठीत अद्याप तरी अनुभव जिरवून समग्र विश्व उभा करणारा कादंबरीकार जन्मलेला नाही. नेमाडेंच्यात ही ताकद होती; पण त्यांनी आत्मानुभवाला प्राधान्य दिल्याने त्यांची कादंबरी मर्यादित राहिली. **थोडक्यात, अस्तित्वाचे चरित्र म्हणजे आत्मचरित्र नव्हे, तर समकालीन अवकाशाचे लेखकाने अस्तित्वात मुरवलेले चरित्र होय.**

नेमाडे यांच्या सर्वच समीक्षा-लेखनात अनुभवाच्या वस्तुनिष्ठ चित्रणावर अकारण भर दिलेला असतो; किंबहुना नेमाडे त्यांच्या समीक्षेत वास्तववादाचा हिरिरीने पुरस्कार करताना दिसतात. कदाचित मराठीच्या वास्तवापासून सतत पळ काढणाऱ्या साहित्यामुळे नेमाडेंनी हा स्टान्स घेतला असावा. माझ्या मते लेखकाची प्रतिभा ही केवळ अनुभव स्वीकारून थांबत नाही.

ती त्या अनुभवांचा कायापालट करते. कविता तर अनेकदा अस्तित्वाचा कायापालट असते. नेमाडे ह्या कायापालटीला महत्त्व देत नाहीत. माझ्या मते साहित्य हे केवळ विश्वाचे सभावात्मक चरित्रच नसते, तर ते ह्या विश्वाची लावलेली **सभावात्मक व्यवस्थाही असते**. आपले मन केवळ अनुभवांच्या वस्तुनिष्ठ नोंदी ठेवून थांबत नाही, तर ह्या अनुभवांची आपल्या जीवनानुभवाच्या संदर्भात सतत व्यवस्था लावत असते. त्यासाठी अनुभवांची पुनर्रचना करत असते. लेखक ह्या विश्वाची सभावात्मक व्यवस्था लावताना ह्या विश्वाचा कायापालटही करत असतो. सर्वच कलावंत त्यांच्या कलात हेच करत असतात; मात्र हा कायापालट करत असताना ज्या विश्वाचा कायापालट घडवायचा असतो ते विश्व प्रचंड व्याप्ती असलेले दृढ, ठोस, वजनदार वगैरे असायला हवे. मराठीतील अनेक लेखकांच्या विश्वाचाच धड पत्ता नसतो. त्यांचे मूळ विश्व इतके भुसभुशीत, ढिसाळ, क्षुद्र असते, की त्याचा कायापालट हा एक विनोद वाटायला लागतो. खानोलकर आणि रेगे यांच्या कादंबऱ्या ह्याचे उत्तम उदाहरण आहे. खानोलकरांचे स्वतःचे विश्व व अस्तित्वचरित्र हे अत्यंत कोते, ढिसाळ होते, पण त्यांची प्रतिभा असाधारण होती. परिणामी अस्तित्वाचा, विश्वाचा कायापालट करण्याची त्यांची ताकद अफाट होती; पण ज्या विश्वाच्या अस्तित्वाचा कायापालट करायला ते निघायचे त्यातच दम नसल्याने त्यांची ताकद मर्यादित झाली. त्यातच प्रतिभा कायापालट करताना दोन पातळ्यांवर काम करते. **(१) अस्तित्वातील तपशीलांचा कायापालट करणे (२) अस्तित्वातील तपशीलांची व्यवस्था लावणे.** ह्यातील तपशीलांची व्यवस्था लावण्यासाठी जी बौद्धिक प्रतिभा लागते ती खानोलकरांकडे नव्हती. परिणामी कायापालट आणि ह्या कायापालटीसाठी कल्पनेचा अधिकाधिक वापर हीच त्यांची गरज बनली आणि एक चांगला प्रतिभावंत वाया गेला. श्री. ना. पेंडसे, गो. नी. दांडेकर वगैरे लेखक हे ह्या रोमॅण्टिक कायापालटीचे आणखी काही बळी. ह्याला प्रतिक्रिया म्हणून नेमाडेंनी त्यांच्या समीक्षेतून ह्या कायापालटीला जवळजवळ हद्दपार केले. वास्तविक मराठीत कायापालटी फोफावली त्याचे कारण लेखकाचा वकूब होता. त्यासाठी संपूर्ण कायापालटीला हद्दपार करण्याची काहीच गरज नव्हती. नेमाडेंच्या ह्या दृष्टिकोनामुळे खुद्द त्यांची 'कोसला' मधली झेप नंतरच्या कादंबऱ्यांत गायब झाली. आणि आज ज्या नेमाडेपंथी कादंबऱ्या निर्माण होत आहेत त्यांनीही नेमाडेंचाच कित्ता गिरवल्यामुळे त्याही विश्वाची व्यवस्था लावण्यात अयशस्वी झालेल्या आहेत. 'कोसला'त एक अव्यवस्था हीच व्यवस्था होती. बिढार, जरीला, झूलमध्ये ही अव्यवस्था धार गमावून बसलीये आणि नव्या व्यवस्थेचा अजिबात पत्ता नाही. नेमाडेपंथी कादंबऱ्यांनी नेमाडेंचे हे अपयश अधिक ताकदीने गिरवायला सुरुवात केलीय. ह्या लोकांना कुणीतरी सांगितले पाहिजे की, केवळ

**वस्तुनिष्ठता** ही कसोटी लावायची ठरवली तर आयर्विंग वॉलेस, आर्थर हॅली हेही अशा वस्तुनिष्ठ तपशीलांची गर्दी करून सोडतात. आर्थर हॅलीसारखा लेखक 'हॉटेल'सारख्या कादंबऱ्यांत हॉटेलचे हुबेहूब तपशील रंगवतो. आयर्विंग वॉलेस 'सेकंड लेडी'मध्ये असेच रशियन आणि अमेरिकन राज्यप्रशासन व्यवस्थेचे हुबेहूब तपशील उभे करतो; पण म्हणून ह्यांना कोणी थोर कादंबरीकार मानत नाही. केवळ कुणीतरी मराठीतील वर्तमानपत्राचे हुबेहूब तपशील उभे करायचे आणि मग त्यांना नेमाडेपंथीयांनी 'पाहा अस्सल वास्तववाद' म्हणून दाखवावयाचे आणि मग सगळ्यांनीच एकमेकांची पाठ थोपटायची, असा एक धमाल प्रकार सध्या मराठीत चालू आहे. नेमाडेंनी अड्डेबाजीवर टीका करायची आणि ह्यातून देशीवाद्यांनी स्वतःचाच एक अड्डा उभा करायचा असाही एक गंमतीशीर प्रकार सध्या मराठीत चालू आहे. मग गो. मा. पवारांनी नेमाडेंची थोरवी सांगायची, नेमाडेंनी चित्रेंना थोर मानायचे, चित्रेंनी नेमाडेंचे सकारण आणि पाध्येंचे अकारण कौतुक करायचे. ही अड्डेबाजी नव्हे तर समविचारी लोकांची गर्दी आहे असेही ह्यावर म्हणता येईल. पण सर्व अड्डेबाजी ही समविचारी लोकांच्या गर्दीतूनच निर्माण होते हे ह्या लोकांनी जितक्या लवकर लक्षात घेता येणे शक्य आहे तेवढ्या लवकर घ्यावे. कारण नेमाडे, चित्रे वगैरे लोक सचोटीचे लोक आहेत; पण ही सचोटी सर्वांच्यात असेलच असे नाही, थोडक्यात, वस्तुनिष्ठ तपशीलांची आणि वास्तववाद्यांची गर्दी जमवून मराठी कादंबरी मोठी होणार नाही तर विश्वाची व्यवस्था लावण्याची क्षमता आपल्या ठायी निर्माण करावी लागेल आणि त्यासाठी विश्वाची व्यवस्था लावताना वास्तवाचा कायापालट करावा लागतो ही वस्तुस्थिती स्वीकारावी लागेल.

लेखनाचे मोठेपण लेखकाच्या अनुभवसंपत्तीवर अवलंबून असते हे नेमाडेंचे मत खरे आहे. पण ही अनुभवसंपत्ती लेखकाच्या लेखनातून व्यक्तही झाली पाहिजे. वि. स. खांडेकर हे अनुभवसंपन्न होते. त्यांची प्रामाणिकता वादातीत होती, पण आविष्कारपध्दती ढोबळ होती. तेव्हा अनुभवाच्या सर्व सूक्ष्म आणि स्थूल आयामांना सर्व तंत्राचा सर्वात्मक वापर करून लेखकाला किंवा कोणत्याही कलावंताला खुलवता आले पाहिजे. लेखकाची वाङ:मयीन मूल्ये व जीवनमूल्ये वेगळी असू नयेत असे नेमाडे म्हणतात, आणि त्याचबरोबर लेखक लिहिताना आदिलेखक झाला की श्रेष्ठ कलाकृती निर्माण होते असेही म्हणतात. ह्या दोन मतात परस्पर-विरोधाभास आहे. लेखक जर लिहिताना आदिलेखक बनून काम भागत असेल तर मग जीवनात त्याला त्याची वाङ:मयीन मूल्ये घेऊन जगण्याची गरजच काय ? माझ्या मते लेखक जेव्हा लिहायला बसतो तेव्हा त्याचे संपूर्ण जीवन त्याच्या लेखणीत हजर असते. त्यामुळेच लेखक तेच लिहितो जे की त्याच्या जीवनात असते किंवा जीवनातून निर्माण होऊ शकते. जर लेखक पलायनवादी असेल

तर त्याचे लेखनही पलायनवादी असते. एखादा लेखक मी फक्त लिहिताना आदिलेखक होतो असे म्हणाला तर ते शक्य नाही हे त्याला सांगायला हवे; कारण कुठलीही कलाकृती ही त्या कलावंताच्या संपूर्ण जीवनाची निर्मिती असते. जर तो आध्यात्मिक म्हणून एरव्ही जगत असेल तरच लिखाण करतानाही त्याला आध्यात्मिक लेखक होणे जमेल; अन्यथा त्याची आध्यात्मिकता ही फोफशी असेल. अशा फोफशा आध्यात्मिक लेखकांची परंपरा मराठीत ह. ना. आपटेंपासून सुरूच आहे आणि ती वाढतच आहे. देशीवाद्यांच्यातही फक्त लिहिताना देशी असणारे फोफसे लेखक आहेतच. मराठी लेखक अनेकदा तलवार कमरेला लटकवून म्यान हातात घेऊन लढत असतात. त्यांना वाटते, हे म्यान पाहून शत्रू पळून जाईल. त्यामुळे आशयाच्या तलवारीची धार वाढवण्याऐवजी ते आविष्काराच्या म्यानेवर कलाकुसर करत बसतात. परिणामी काळाच्या ओघात त्यांची तलवार गंजत जाते आणि म्यान फाटत जाते. मराठी वाङ्‌मयाचा इतिहास हा अशा गंजत गेलेल्या तलवारींचा आणि फाटत गेलेल्या म्यानांचा इतिहास आहे. इतर कलांबाबतही काही वेगळी स्थिती नाही.

'नेमाडेंच्या लेखक लेखकराव का होतात ?' ह्या लेखातील मतांचा वर सविस्तर परामर्श घेऊन मी माझेही विचार मांडले. आता आपण नेमाडेंच्या साहित्यिकाची नैतिकता ह्या संकल्पनेकडे वळू. आदिलेखकाप्रमाणे नेमाडेंची हीही संकल्पना स्पष्ट झालेली नाही; किंबहुना आदिलेखक ह्या संकल्पनेपेक्षा ती आधिक संदिग्ध आहे. नेमाडेंच्या मते, *कादंबरी हा वाङ्‌मयप्रकार अधिक समाजसापेक्ष असल्याने चित्रण करताना कादंबरीकाराला एक विशिष्ट प्रकारची नैतिकता स्वीकारावी लागते. उदा. रणजीत देसाई यांच्या कादंबरीतील रमाबाईच्या सती जाण्याच्या घटनेचे चित्रण. इथे सती जाणे योग्य की अयोग्य ह्याविषयी एक नैतिक भूमिका कादंबरीकाराला घ्यावी लागते. जर त्याला ती घटना योग्य वाटत असेल तर कादंबरीकार ही घटना उदात्त करेल आणि रमाची इमेज एक सती जाणारी थोर स्त्री असे करेल. रणजीत देसाईंनी ह्या नैतिकतेच्या आधारे हे चित्रण केले आहे.* ही नैतिकता पारंपरिक आहे आणि नेमाडे यांच्या मते ह्या पारपंरिक नैतिकतेच्या समर्थनामुळेच मराठी कादंबरी तकलादू झाली आहे. ह्याउलट आधुनिक नैतिकता असलेला कादंबरीकार ह्या घटनेचे चित्रण करताना रमाबाईला सती जाण्यास प्रवृत्त करणारे अंधश्रद्धात्मक घटक, त्यामागचे सामाजिक हितसंबंध यांचे तपशील मांडून जरी रमा स्वखुशीने सती गेली तरी ती एका अर्थाने अंधश्रद्धेचाच बळी होती हे वाचकापर्यंत पोहोचवेल. ह्याउलट ज्याच्याजवळ नैतिकता नाही असा कादंबरीकार हा प्रसंग रोमॅन्टिक करून त्याच्या आसपासचे सामाजिक तपशील छाटून टाकेल. पु. शि. रेगे, खानोलकर, गौरी देशपांडे हे कादंबरीकार असे कसलेही

नैतिकतेचा कणा नसलेले कादंबरीकार आहेत. ह्यातील रेगे रमाच्या रूपाला मातृका इमेजमध्ये विरघळवून टाकतील. ती राधा आणि माधव कृष्ण होईल. माधवाला ब्राह्मण जात नसेल. राज्यकारभार कादंबरीबाहेर हाकला(हाकलला) जाईल. खानोलकर रमाला देवी दाखवून सती जाताना तिचे स्तन कसे उन्नत होते हे आपल्या मिस्टीक मिस्टीक शैलीत सांगतील, तर गौरी देशपांडे रमाबाईच्या प्रेमात एका इंग्रजी ऑफिसरला पाडतील आणि हा ऑफिसर स्कॉटिश की आयरिश तेही त्यांना माहीत नसेल. ह्यातील रेगेंच्या कादंबरीत रमा सती जाणारच नाही. गौरी देशपांडे रमा आणि ब्रिटिश ऑफिसर यांच्या शरीरसंबंधावर निम्मी पाने खर्ची घालतील आणि त्यांच्या संबंधाचा विच्छेद झाला, ब्रिटिश ऑफिसर इंग्लडला निघून गेला की कादंबरी संपवतील, तर खानोलकरांच्या वाचकांना रमा सती जाताना कशी तेजस्वी सुवर्णज्योतीसारखी फरफरत होती ते दिसेल.

नेमाडेंच्या मते, *अशा नैतिक संकल्पनांचा व्यूह हा कादंबरीकार समाजचित्रण करत असल्याने त्याला बाळगावा लागतो. कादंबरी ही समाजचित्रण वगळून निर्माण होऊ शकत नाही आणि झाली तरी तिच्यात दम नसतो. मराठीत समाजचित्रण वगळून कादंबरी निर्माण झाल्याने ती दमदार झाली नाही आणि ज्या कादंबरीकारांनी समाजचित्रण केले त्यांची नैतिकता पारंपरिक होती. ही नैतिकता लादून घ्यावीच लागते मात्र ही नैतिकता तरल, वैयक्तिक, स्थितिशील असते. ती सामाजिक ढोबळपणा आणि बटबटीतपणा टाळते. ही नैतिकता सामाजिक वास्तवाच्या आकलनातून निर्माण होते आणि ह्या आकलनानुसार तिचे घटकही बदलतात. जर ह्याऐवजी स्वत:चे घटक सामाजिक आकलनावर ह्या नैतिकतेने लादले तर ती आशयाला मारक ठरते. स्वत:चे घटक कादंबरीतील वास्तवावर लादणारी नैतिकता ताठर असते व ही दुय्यम प्रतीचे कादंबरीकार निर्माण करते. ह्या नैतिकतेच्या व्यूहात वाचक आपोआपच सापडतो आणि कादंबरीत ही नैतिकता वाचकाला जेवढे आव्हान देईल तेवढा तिचा अंतर्भाव कादंबरीत असतो* असे नेमाडे सुचवतात. *खोट्या काल्पनिक वास्तवाच्या किंवा भूतकाळाच्या आधारे उभ्या केलेल्या कादंबऱ्यांत नैतिकतेचा अभाव सहज शक्य असतो. वर्तमान वास्तवावर उभारलेल्या कादंबरीत नैतिकता टाळणे कठीण असते; कारण ह्या वर्तमानाविषयी वाचकाची काही नीतिमत्ता असणार हे गृहीत धरूनच लिखाण करावे लागते. मराठीतील फडके, खांडेकर, माडखोलकर वगैरेपासून मराठी कादंबरीकार नैतिकता टाळत आलेले आहेत.* (पाहा, टीकास्वयंवर पान १६४ ते १६५)

नेमाडेंच्या ह्या नैतिकतेच्या संकल्पनेतला एक परस्परविरोध असा की, एकीकडे नेमाडे कादंबरीतील समाजचित्रणासाठी नैतिकता आवश्यक मानतात, तर दुसरीकडे भूतकालीन वास्तवात

नैतिकता टाळता येते असे म्हणतात. वास्तविक समाज सर्वच काळात अस्तित्वात असतो. नेमाडे यांना भूतकाळात समाज अस्तित्वात नसतो असे म्हणायचे आहे का ? भूतकाळातील समाजचित्रण करतानाही लेखकाला एक नैतिकता स्वीकारावीच लागते हे मी रमाबाईच्या सती जाणे ह्या घटनेकडे बघताना वेगवेगळे कादंबरीकार कसे पाहतील ते दाखवून सिद्ध केले आहे. भूतकालीन घटनेकडे वेगळ्या नैतिकतने पाहून तिचे चित्रण केल्यास काय परिणाम होऊ शकतात हे सलमान रश्दीच्या सॅटनिक व्हर्सेसवरून सहज सिद्ध होऊ शकेल. आजही रामाबाबत वेगळ्या नैतिकतेने पाहाणे भारतात अशक्य झाले आहे. तेव्हा वर्तमानकालीनच नव्हे तर भूतकालीन आणि भविष्यकालीन समाजचित्रणातही नैतिकता येत असते आणि लेखक पलायनवादी असेल तर भूतकाळातीलच नव्हे तर वर्तमानकाळातील घटनांवर आधारित कादंबरीतही तो नैतिकता टाळू शकतो.

नेमाडे लेखकाच्या नैतिकतेचे विवेचन करतात. त्यांच्याच भूमिकेवरून वरील मुद्दा मांडला; पण मुळात प्रश्न असा उपस्थित होतो की लेखकाला नैतिकता लागते का ? की त्याहून आधिक मोठा व्यापक पट लागतो. माझ्या मते कादंबरी ही समाजचित्रण करत नसते, तर लेखकाचा ह्या विश्वाकडे पाहण्याचा एक समग्र दार्शनिक दृष्टिकोन मांडते, ह्या विश्वाचे समग्र स्वरूप उलगडून दाखवते, म्हणूनच लेखकाला नैतिकतेची नव्हे तर दर्शनतेची गरज असते. ही दर्शनता एवढी विशाल लागते की विश्वातील नैतिकतेच्या वेगवेगळ्या व्यक्तींच्या आणि कळपांच्या संकल्पना त्यात सामावून गेलेल्या असतात. समाजात सती जावे किंवा सती न जावे किंवा तटस्थ असे तिन्ही दृष्टिकोन एकाचवेळी अस्तित्वात असतात आणि लेखकाने ह्यातील केवळ एका नैतिकतेची निवड करणे त्याची कादंबरी संकुचित करते. खरी कादंबरी ह्या तिन्ही नैतिकतेच्या संकल्पनांचे सखोल आकलन आणि आविष्कारण करते. म्हणूनच लेखकाला नैतिकतेची नव्हे तर दर्शनतेची गरज असते. मराठीत अद्याप धड जिथे एका नैतिक संकल्पनेचाही सखोल आविष्कार नसतो तिथे समाजातील समकालीन सर्व नैतिकता व्यक्त होणे ही फारच दूरची बाब आहे. लेखकाची ही दर्शनता म्हणजे समग्र विश्वाचा आकलनाचा त्याचा संकल्पनात्मक व्यूह असतो. त्यात विश्वातील सर्व ज्ञाने, तत्त्वज्ञाने, निरसर्ग, मानव, मानवेतर प्राणीसृष्टी ह्यांचा समावेश होतो. लेखक ह्या दर्शनतेच्या आधारे त्यांची व्यवस्था लावतो. मराठीत अशा प्रकारची दर्शनता फक्त ज्ञानेश्वर, तुकाराम ह्या दोघांच्याकडे आढळते. आधुनिक काळात असा एकही लेखक मराठीने दिलेला नाही. नामदेव, रामदास, चित्रे, नेमाडे, ढसाळ हे ह्या दर्शनतेच्या आसपास पोहोचतात. ह्यातील रामदासांकडे दर्शनता असली तरी आविष्कार- कौशल्ये व काव्यात्मक प्रतिभा कमीच दिसते. नामदेव, चित्रे,

ढसाळ हे तिघेही कवी असल्याने समाजचित्रणाला पारखे झालेले दिसतात. त्यातील ढसाळांकडे सर्वात्मकता आहे; मात्र चित्रेच्यांकडे असलेली काव्यात्मक निर्मितीची खोल समज व नैसर्गिकता त्यांचे ठायी नाही, तर चित्रे नको तितके कवी आहेत. त्यामुळे कादंबरीकाराची सर्वात्मक झेप त्यांच्या ठायी नाही. नेमाडे काव्यात्मक सर्जकतेला कमी पडतात. मात्र आधुनिक काळात कादंबरीकाराची सर्वात्मक झेप त्यांच्याकडे आहे, पण समाजाचे सर्वांगीण चित्रण त्यांना जमत नाही; कारण त्यांना त्यांच्या अनुभवाचा वकूब कल्पनेने कायापालट करून भरून काढता आला असता तो भरून काढता आला नाही आणि मराठी कादंबरी विसाव्या शतकात वैश्विक पातळीवर वांझच निपजली. चित्रेंच्या रूपाने मात्र मराठीला वैश्विक पातळीवर एक मोठा कवी देता आलाय ह्यात शंका नाही. ढसाळांकडेही ही ताकद होती, पण त्यांनी कविता यांत्रिक पद्धतीने राबवल्याने ती मानवी स्पर्शाला हळूहळू पारखी होत गेली. हे सर्वच लेखक त्यांच्या दर्शनतेमुळेच मोठे झाले.

लेखकाची दर्शनता ही खालील संकल्पनांची व्यामिश्र जडणघडण असते.

**(१) वास्तवता :** भोवतालच्या सर्व वस्तूंचे मूळ सौष्ठव, मूळ आकार काय आहे ह्या वस्तूंची व्यवस्था किंवा संस्थात्मक स्वरूप काय आहे, त्यांच्या क्रिया कशा कोठे चालतात हे कलावंताला ज्ञात असावे लागते.

**(२) क्रियाकारणता :** ह्या क्रिया का चालतात, ह्यामागच्या नेमक्या तृष्णा काय आहेत हे त्याला ज्ञात असावे लागते.

**(३) तृष्णा :** ह्या क्रिया ज्या कारणामुळे किंवा तृष्णांमुळे चालतात त्यांचे रूप काय, ह्यातून कोणते भाव निर्माण होतात, हे त्याला माहीत असावे लागते.

**(४) संस्कारणता :** ह्या क्रिया घडताना त्यांच्या आधीचे संस्कारण काय होते, त्याचा त्या वस्तूवर, मितिकावर (माणसावर) काय परिणाम आहे हे कलावंताला ज्ञात असावे लागते. संस्कारणाच्या (कंडीशनिंग) आकलनातून माणसाचा स्वभाव काय आहे आणि तसा तो का आहे ह्याचा पत्ता लागतो.

**(५) विश्वकारणता :** हा जो सारा मितिकांचा तृष्णांचा अवाढव्य पसारा आहे त्यामागचे कारण काय, तो का चालतो, तो का आहे कशासाठी आहे ह्या मूलभूत प्रश्नांना कलावंताला भिडावे लागते.

**(६) नैतिकता :** वरील पाचही संकल्पना स्पष्ट झाल्यानंतर त्याला विश्वाची आपल्या माध्यमात व्यवस्था लावावी लागते, त्यासाठी तपशीलांची निवड करावी लागते. त्यांची मांडणी

कशी करायची, त्यासाठी त्याचे व्यवस्थापन कसे करायचे हे त्याला ठरवावे लागते. त्यासाठी एक मूल्यव्यवस्था त्याला निर्माण करावी लागते.

**(७) कायापालटता :** विश्वाची व्यवस्था लावण्यासाठी अनेकदा तपशीलांचा, त्यांच्या संरचनेचा, त्यांच्या व्यवस्थेचा कायापालट करावा लागतो. त्यांचा आकार, त्यांचे सौष्ठव, त्यांचा दर्जा हे सारेच बदलावे लागते.

वरील सात गोष्टींतून कलावंताची दर्शनता निर्माण होत असते. त्यातून तो संपूर्ण विश्व उलगडून ते पुन्हा एकदा नव्या व्यवस्थेच्या आधाराने त्याच्या माध्यमात मांडून दाखवतो. नेमाडे यांच्या मते दुय्यम नैतिकतेतून दुय्यम प्रतीचा कादंबरीकार निर्माण होतो. मला वाटते दुय्यम प्रतीचा कादंबरीकार दुय्यम प्रतीचे दर्शन निर्माण करतो. दर्शनतेचा नैतिकता ही एक भाग असते. दर्शन दुय्यम दर्जाचे असेल तर नैतिकताही दुय्यम असते. कुठल्याही कादंबरीत वेगवेगळी नैतिकता घेऊन वेगवेगळी पात्रे वावरत असतात. नेमाडेंच्या मते भोवतालच्या वास्तवाच्या आकलनानुसार कादंबरीकाराची नैतिकता बदलते. ती स्थितिशील तरल असते. माझ्या मते कादंबरीकाराची दर्शनता ही केवळ असते आणि कादंबरीतील पात्रे त्यांच्या वास्तवाच्या आकलनानुसार त्यांची नैतिकता धारण करतात; मात्र नेमाडे म्हणतात तशी ही नैतिकता स्थितिशील नसते, तर गतिशील असते. नेमाडे जेव्हा नैतिकतेला स्थितिशील समजतात आणि ती वास्तवाच्या आकलनानुसार बदलतात असे म्हणतात तेव्हा ते वास्तवाचे आकलन हेही स्थितिशील समजतात. पर्यायाने वास्तवही स्थितिशील समजतात. हा नेमाडेंच्यांतला टिपिकल हिंदूपुरुष बोलतो आहे. प्रत्यक्षात वास्तव, वास्तवानुसार आकलन, आकलनानुसार नैतिकता आणि ह्या नैतिकतेनुसार पात्रे सतत बदलतात. ही एक गतिशील प्रक्रिया असते आणि ह्यातील नैतिकताही गतिशील असते. अशा सर्व नैतिकतांच्या गतिशीलत्वाचे समग्र भान दर्शनता देते. ही दर्शनता स्थितिशील नसते किंवा गतिशीलही नसते, तर स्थितिशीलतेबरोबर ती स्थितिशील तर गतिशीलतेबरोबर ती गतिशील असते. ती कादंबरीतील समग्रतेमागे फक्त असते. ती लेखकाच्या जीवनाचे, अस्तित्वाचे सार असते आणि कादंबरी ह्या सारतत्त्वाचे भाषेत केलेले रूपांतर असते. कुठलीही कलाकृती ही कलावंताच्या अस्तित्वाचे माध्यमात झालेले रूपांतरच असते. नेमाडेंच्या मते नैतिकता ही फक्त कादंबरीला लागू होते. माझ्या मते दर्शनता सर्व कलांमागे सर्व वाङ्मयप्रकारांमागे असतेच आणि नैतिकता ही दर्शनतेचा भाग असल्याने तीही सर्व कलांमागे असते. कविता लिहितानाही नैतिकता असतेच. अगदी खाजगी प्रेमकविता लिहितानाही स्त्रीकडे पाहण्याची तुमची नैतिकता तुम्ही व्यक्त करत असता. पु. शि. रेगेंची प्रेयसी ही मध्ययुगीन नैतिकतेचे प्रतिनिधित्व करते, तर

दिलीप चित्रेंची स्त्री ही शरीराच्या पलीकडे चित्रेंना काही देत नसावी किंवा चित्रेंना तिच्या सुखदुःखाविषयी फारशी फिकीर नसावी असे वाटते. ज्ञानदा ठाकूर यांच्या मते अमेरिकेत राहूनही चित्रे स्त्रीमुक्ती चळवळीतून आलेल्या नैतिकतेला पारखे झालेत याचे आपण आश्चर्य करायला हवे. मला वाटते, आम्ही सर्वच पुरुष कवी कळत नकळत स्त्रीविषयी मध्ययुगीन नैतिकताच व्यक्त करत असतो. (ह्याला मीही अपवाद नाही). आमच्या कवितेतील स्त्रियांना फक्त धडच असते. शीर आणि शिरातील मेंदू नावाच्या प्रकाराविषयी आम्ही कळत नकळत उदासीनताच दाखवत असतो. थोडक्यात, दर्शनता सर्वच ठिकाणी असते आणि नैतिकता ही तिचाच भाग असल्याने तीही सर्वच कलांमागे, कलाप्रकारामागे असते.

ज्या देशातील लोकांना लेखकाच्या सामाजिक बांधिलकीचे काडीचेही सोयरसुतक नाही, त्या देशातील लोकांशी बांधील राहून बांधिलकीचे साहित्य निर्माण करण्याचे व बांधिलकीवर चर्चा करण्याचे करंटे भाग्य ह्या देशातील लेखकांवर आले आहे. नेमाडेंनी 'बांधिलकीचे सामाजिक संदर्भ' ह्या निबंधात सामाजिक बांधिलकीची चर्चा केली आहे. साहित्याने समाजाला आवश्यक अशा सौंदर्यदर्शनाबरोबरच बोध, ज्ञानसंवर्धन, नीतिदर्शन इत्यादी कार्ये पार पाडावयाची असतात, हे नेमाडेंचे मुख्य गृहितक आहे.

माझ्या मते **कवीला** स्वतःचे संपूर्ण **अस्तित्व** तर **कादंबरीकाराला** संपूर्ण **विश्व** भाषेत उमटवायचे असते. त्यामुळे साहित्यात आपोआपच ज्ञानसंवर्धन, जीवनबोध, नीतिदर्शन ह्या गोष्टी उमटतात. साहित्यिकाने हे कार्य कार्य म्हणून करू नये किंवा सामाजिक बांधिलकी मानून ह्या गोष्टी आपल्या साहित्यात **घुसडू** नयेत. आज अनेक मराठी साहित्यिकांच्या अस्तित्वातच ज्ञान, जीवन, नीती ह्याबाबत कसले वादळ नाही. तेव्हा त्यांच्या साहित्यात ह्याचे काय पडसाद उमटणार ? माझ्या मते सामाजिक बांधिलकी ही संस्कारणात येतेच. **संस्कारण हे पूर्णतः व्यक्ती व समाजसापेक्ष असते** आणि लेखकांच्या अस्तित्वाची संपूर्ण जडणघडण ही पूर्णपणे ह्या संस्कारणावर अवलंबून असते. यामुळे लेखकाने कितीही पळ काढतो म्हटले तरी समाजापासून त्याला पळ काढता येत नाही. त्याच्या संस्कारणात समाज आपला संसार थाटून असतोच. त्यामुळे लिखाण करताना स्वतःच्या किंवा इतरांच्या संस्कारणाच्या आकलनाच्या प्रमाणात त्याची सामाजिक बांधिलकी प्रकट होत राहते. अनेकदा लेखक तात्त्विक पातळीवर सामाजिक बांधिलकी स्वीकारतो पण मूळातच स्वतःच्या किंवा पात्रांच्या संस्कारणाचे त्याचे आकलन अत्यंत उथळ असते. परिणामी ह्या तथाकथित समाजमानी कादंबऱ्या भुईसपाट झालेल्या आढळतात. ह. ना. आपटे, खांडेकर, केतकर इत्यादींच्या कादंबऱ्या ह्या अशा कादंबऱ्या आहेत. तेव्हा सामाजिक

बांधिलकी मानली म्हणजे कादंबरी थोर होते असे मानायचे कारण नाही किंवा सामाजिक बांधिलकी न मानणारा लेखक समाज उमटवणारच नाही असेही नाही. मर्ढेकर हे ह्याचे उत्तम उदाहरण आहे, प्रश्न सामाजिक बांधिलकीचा नाही, तर प्रश्न लेखकाच्या पात्राच्या जडणघडणीतील संस्कारणाच्या आकलनाचा आहे, पु. शि. रेगे, खानोलकरांना पात्रांच्या संस्कारणाचे आकलन काडीचेही नाही. त्यामुळे त्यांच्या कादंबऱ्या पोरकट आणि गुलछबू वाटतात. खानोलकर निदान दर्शनतेतील कारणता (ह्या घडामोडी का घडतात) ह्या तत्त्वाचा तरी पाठपुरावा करतात. रेग्यांना हेही प्रश्न पडत नाहीत.

सर्वसाधारणपणे आज मराठीत सामाजिक बांधिलकीविषयी काही भाबडे समज असतात. लेखकाने लिखाण करतानाच त्याच्या परिणामाचा विचार आधीच करावा वगैरे वगैरे. वास्तविक निर्मिती करताना लेखकाने साहित्यात संपूर्ण विश्व कसे उमटवता येईल ते पाहावे. समाज काय म्हणेल ? समाजाचे काय होईल ? हे प्रश्न विचारू नयेत. एखादा बुद्ध जेव्हा इतरांना मार्गदर्शन करतो तेव्हा तो सामाजिक बांधिलकी मानत नसतो, तर संपूर्ण जीवनानुभव, संपूर्ण परमशांती लोकांना उपलब्ध व्हावी म्हणून धडपडत असतो. लेखकानेही संपूर्ण जीवनानुभवाला भाषेत उपलब्ध करावे. हाच त्याचा मोक्ष होय आणि त्यातूनच लोकांना ज्ञान, बोध वगैरे मिळतो. जे लेखक ह्याऐवजी सामाजिक क्रांती, परिवर्तन वगैरेसाठी लिहितात तेव्हा अनेकदा भोंगळ लिहितात. तुमच्या जीवनाची भूमिका परिवर्तनवादी असेल आणि तुम्ही तुमचे जीवन, तुमचे अस्तित्व प्रामाणिकपणे भाषेत उमटवत असाल तर तुमच्या साहित्यात आपोआपच परिवर्तनवादी भूमिका उमटते. नामदेव ढसाळांचे राजकारण त्यांच्या कवितेत सहज उमटलेले दिसते. ह्याउलट काही कवींनी त्यांच्या ठायी नसलेले दलितत्व साहित्यात उमटवण्याचा प्रयत्न केला आणि अत्यंत भोंगळ कविता त्यांनी निर्माण केली. अलीकडे अत्यंत ऐषआरामात वाढलेली दलित कवींची दुसरी फळी केवळ मार्केटमध्ये डिमांड आहे म्हणून तथाकथित क्रांतिकारक कविता लिहिताना दिसते. हॉस्टेलमध्ये दारू पीत पीत जे गाव आयुष्यात कधी पाहिले नाही तिथल्या दलित अत्याचारावर हे लोक दारू पोटात ढकलत चर्चा करतात आणि दलित कविता लिहितात. असली भोंगळ सामाजिक बांधिलकी साहित्याचे फारसे भले करील असे मला वाटत नाही. त्यापेक्षा रेग्यांसारखी कलावादी मंडळी परवडली. निदान ही मंडळी काहीतरी चांगले लिहितातच.

नेमाडेंनी ह्या बांधिलकीचे जे विवेचन केले आहे ते पाहू. नेमाडेंच्या मते लेखक हा समूहमनाचा भाग असलाच पाहिजे. साहित्याने ज्ञानसंवर्धन, नीतिदर्शन, बोध ही कार्ये केलीच पाहिजेत. ही नेमाडेंची सक्ती मला मान्य नाही; कारण तशी सक्ती करण्याची गरज नाही. कारण साहित्यात

लेखकाचे किंवा पात्राचे संस्कारण उमटतच असते. त्यामुळे लेखकाने स्वतःला, विश्वाला किंवा पात्राला संपूर्ण उमटवले की आपोआपच सामाजिक बांधिलकी पाळली जाते.एवढेच मला सुचवायचे आहे. ह्याबाबतीतली सक्ती ही अनेकदा राजकीय सेन्सॉरशिप निर्माण करते आणि त्यातून भोंगळ सामाजिकता निर्माण होते. रशियन राज्यक्रांतीनंतरचे राजकीय साहित्य हे त्याचे उत्तम उदाहरण आहे. समाज उदारमनाने स्वातंत्र्य देतो ह्या नेमाडेंच्या मतात दम नाही. रिडल्स प्रकरणाने आणि सलमान रश्दी प्रकरणाने ते सिद्ध केले आहे. अमेरिकेसारख्या देशातही साम्यवादी लेखक म्हणून जगणे किती अवघड झाले होते ते सर्वश्रुत आहे. आज भारतीय सेन्सॉर बोर्डाच्या नियमानुसार चित्रपटात पात्रांची जात दाखवता येत नाही. परिणामी ह्या माध्यमाला जातीयता दाखवता येत नाही. आपले नायक व नायिका त्यामुळेच बिनजातीच्या असतात असो. थोडक्यात, कुठलाही सुबुद्ध लेखक स्वतःचे किंवा विश्वाचे संपूर्ण अस्तित्व उमटवत सामाजिक बांधिलकी पाळतोच. ह्याउलट जे निर्बुद्ध असतात ते स्वतःचे किंवा विश्वाचे संपूर्ण अस्तित्व टाळतात आणि एकतर पलायनवादी लेखन करतात किंवा उथळ सामाजिक लेखन निर्माण करतात. ह्या दोन्हीही गोष्टी सारख्याच भोंगळ असतात. समाजात बहुतांशी वाचक हा आयुष्यातल्या प्रखर वास्तवापासून पळ काढण्यासाठीच वाचन करत असल्याने पलायनवादी लेखक हे सर्वांत जास्त खपतात. एका अर्थाने समाजातल्या सर्वांचीच समाजापासून पळून जाणे ही मानसिक गरज असते. ही गरज लोकप्रिय कलाकृती, मग त्या कादंबऱ्या असोत किंवा नाटक, चित्रपट असोत, भागवत असतात आणि म्हणूनच त्यांचा खप विक्रमी असतो. ह्याउलट बिचारे समाजाकडे समाजाला खेचू पाहणारे गंभीर लेखक वा कलावंत रसिकांची वाट पाहात ताटकळत उभे असतात. पळून जाणे ही समाजाची गरज असते तर पळून न जाणे ही अशा कलावंताची नैतिक गरज असते. दोघांचा लपंडाव ह्या विश्वाचाच भाग असतो. हा लपंडाव एकाचवेळी शोकात्म आणि प्रहसनात्मक असतो. ह्या प्रहसनात सर्वांत विनोदी भूमिका करणारे विदुषक म्हणजे समाजाच्या मागणीप्रमाणे त्याला पुरवठा करणे, म्हणजे सामाजिक बांधिलकी असे मानणारे कलावंत हे लोक, मग गीत, वात्रटिका वगैरे वगैरे लिहितात.आम्ही लोकांची खरी गरज भागवतो म्हणून स्वतःला सामाजिक म्हणवतात. हे व्यासपीठावर कलावंत जमातीचे नेतृत्व करतात, विदूषकी चाळे करतात. लोकप्रिय होतात आणि क्वचितच सत्ता फिरेल तशी आपली कलात्मक टोपीही फिरवतात. सरकारकडून कमिट्या पदरात पाडून घेतात. अर्थात ह्या विदूषकांची समाजाला सर्वांत अधिक गरज असते आणि मनोरंजनाचा खेळ शतकानुशतके चालत राहतो. '**सामाजिक बांधिलकी**' हे त्याचे टायटल असते.

नेमाडेंच्या मते बांधिलकीची संकल्पना वैश्विक असून ती देशकालपरत्वे बदलत असते.

माझ्या मते ती व्यक्तिगणिकही बदलत असते. अल्जेरियात वैयक्तिक संतापाची परिणती गोऱ्या माणसाकडून खून करण्यात होते ह्याला कारण अल्जेरियापेक्षा आल्बेयर कामूची वैयक्तिक बांधिलकी असते. अल्जेरियात सर्वच लेखकांत ती तशीच असेल असे नाही. साने गुरुजींची वैयक्तिक बांधिलकी असते. सावरकरांनी हे लिखाण केले तर त्याची परिणती अहिंसेतच झाली असती असे म्हणवत नाही.संस्कारण हे समाजसापेक्षं असल्याने ते देशकालाशी निगडित असते; पण संस्कारण हे मागील संस्कारणावरही तेवढेच उभे असल्याने ही सामाजिक बांधिलकी व्यक्तीच्या समाजाबाबतच्या अनुभवावरही अवलंबून असते. थोडक्यात, सहा पर्याय समाज देतो म्हणून ती सामाजिक असतें; पण सहापैकी एक पर्याय व्यक्ती निवडते, म्हणून ती व्यक्तिगतही असते. एखादा समाज आणखी वेगळे पर्याय देईल. आजकाल तर लेखकाला संपूर्ण विश्वातून पर्याय उपलब्ध झालेले असतात. हे पर्याय समाजाशी निगडित असतात तर निवड वैयक्तिक संस्कारणावर अवलंबून असते. एखादा प्रतिभावंत नवीन पर्यायही शोधू शकतो.

नेमाडेंच्या मते, *बांधिलकीची संकल्पना प्राचीन आहे; पण अलीकडे मानवी समाजाचे विघटन झाल्याने पाय मुरगळल्यावर मात्र जाणवतो, तशी समाज विघटित झाल्यावर सामाजिक बांधिलकी जाणवते. एकसंध समाजात बांधिलकीचा प्रश्न उपस्थित होत नाही. लेखक समाजातीलच एक भाग असतो. त्याला लेखक म्हणून स्वतंत्र अस्तित्व नसते. केवळ लेखक म्हणून जगणे हा लेखकमनाचा व्यत्यास आहे. कोणत्यातरी स्तरावर लेखक हा समूहमनाचा भाग असलाच पाहिजे. म्हणून लेखकाने सवलतीचा अट्टाहास धरणे ऐतखाऊपणाचे लक्षण मानले पाहिजे.*

ब्राह्मण जाणिवेच्या आणि क्षत्रिय जाणिवेच्या प्रभावाखाली असलेले समाज काहीसे एकसंध होते. अलीकडे क्षत्रिय जाणिवेच्या प्रभावाखाली वाढलेल्या कम्युनिस्टांनी अशाच एकसंध समाजाची निर्मिती करण्याचा प्रयत्न केला आणि लेखकाला स्वतंत्र अस्तित्व नाकारून सामाजिक कार्याच्या गाड्याला जुंपण्याचा प्रयत्न केला. (कम्युनिस्ट राज्याची संकल्पना ही वैश्य जाणिवेला शह देण्यासाठी निर्माण झाली. दुर्दैवाने मार्क्सला राज्य व्यक्तिवादी वैश्य जाणिवेकडून समूहवादी वैश्य जाणिवेकडे न्यायचे होते; पण त्याने केलेले मॉडेल मात्र क्षत्रिय जाणिवेचे होते. परिणामी कम्युनिस्ट राज्याच्या नावाखाली नवीन सम्राट व साम्राज्ये उदयाला आली.) वैश्य जाणिवेने इतर अनेक गोष्टीबरोबर लेखकाचेही विशेषीकरण केले. त्याला नकार देण्याचा हा प्रयत्न होता; किंबहुना सामाजिक बांधिलकीची संकल्पना ही अशाच प्रकारच्या प्रयत्नातून जन्मते. वैश्य जाणिवेने माणसाला समाजापासून वेगळा राहून एकांतात किंवा घरात तो भोगू शकेल असा त्याचा व्यक्तिगत

खाजगी वेळ निर्माण केला. (ह्या व्यक्तीच्या खाजगीपणावर अलीकडे टी.व्ही., कॅमेरे यांच्या साहाय्याने आक्रमण करणे पुन्हा शक्य केले आहे आणि ज्यांच्या हातात शासनव्यवस्था व राज्यव्यवस्था आहे ते त्याचा पुरेपूर वापर करत आहेत. विशेषतः अमेरिकेत हे आक्रमण कळसाला पोहोचले आहे आणि अमेरिका हे फॅड जगात सर्वत्र पोहचवून सर्वच जगाला वेगळ्या पद्धतीने जिंकत आहे. हे जिंकणे मानसिक पातळीवर आहे. माणसाच्या मेंदूचे आणि मेंदूतील क्रियांचे चित्रण करणारे कॅमेरे शोधून काढून जगातल्या सर्व मानवांचा उरलासुरला खाजगीपणा तंत्रज्ञानाने नष्ट केला तरी फारसे आश्चर्य वाटू नये. नवीन लेखकांना ह्याविरुद्ध बंड करावेच लागेल. मी माझ्या एका लेखात-कविता (खरेतर कुठलीही कलाकृती) म्हणजे टीव्हीतून आक्रमण करणाऱ्या संस्कृतीविरुद्ध केलेले आध्यात्मिक बंड असते. स्वतःची आध्यात्मिकता शाबूत ठेवण्याचा तो प्रयत्न असतो - असे म्हटले होते त्यामागे ही पार्श्वभूमी होती. पूर्वी राजे लोक सैनिक पाठवायचे. आजकाल शासनसंस्था व अर्थसंस्था त्याऐवजी टीव्हीतून कार्यक्रम पाठवतात) आणि ह्या खाजगी वेळाचे काय करायचे हा व्यक्तीचा प्रश्न बनवला. त्यामुळे पूर्वी कलांचा आस्वाद व कलांची निर्मिती ही एकसंध समाजात एक सामाजिक प्रक्रिया होती, ती वैश्य समाजात खाजगी झाली. त्यामुळेच लेखकाने समूहमनाचा भाग असले पाहिजे हे नेमाडेंचे म्हणणे, नेमाडे क्षत्रिय जाणिवेच्या प्रभावाखाली नांदत असल्याने नेमाडेंना सुचत आहे हे उघड आहे. वैश्य समाजात लेखक हा पूर्णपणे समाजाचा असूच शकत नाही. पूर्वी व्यक्ती समूहमनाचा भाग असल्याने तिच्या सर्व धारणा, मूल्ये सामाजिक असत. आता मात्र त्यात व्यक्तिगततेचा शिरकाव झाला. यातूनच पुढे उदारमतवाद वगैरे आधुनिक विचार जन्मले. त्यांनी व्यक्तीचे व्यक्ती म्हणून अस्तित्व मान्य करायला सुरुवात केली आणि इथेच समाजाच्या एकसंध संघटनेला छेद जाऊ लागला. व्यक्तींची टोकाची वेगवेगळी मते प्रत्यक्ष व्यवहारातही दिसू लागली. व्यक्तीच्या सामाजिक बांधिलकीत व्यक्तिगत संस्कारणाचा प्रवेश झाला आणि प्रत्येक व्यक्तीची सामाजिक बांधिलकी ही व्यक्तिगतच बाब ठरली. वैश्य समाजाने जशी तंत्रज्ञानात्मक पातळीवर प्रगती करावयास सुरुवात केली तस तसे विशेषीकरण वाढू लागले. पूर्वी सगळ्या शरीराचा एक डॉक्टर असे. आता नाक, कान, घसा, दात ह्यांचे वेगवेगळे डॉक्टर तयार होऊ लागले. अशा समाजात लेखक हाही केवळ लेखन करणारी घटक म्हणून उदयास येणे स्वाभाविक होते आणि आहे. नेमाडेंनी त्याला लेखकमनाचा व्यत्यास मानलाय खरा, पण प्रत्यक्षात ती एक अटळ प्रक्रिया आहे. विशेषीकरणाच्या ह्या युगात कला हीही विशेषीकरणाची भाग बनली आहे. पूर्वी कलावंताला त्याच्या त्याच्या समाजातील मर्यादित कलांचे ज्ञान व कलाकृतींची परंपरा होती. महाभारत लिहिणाऱ्या व्यासांना त्यांच्या आधीचे

फारसे काही वाचनाची गरज नव्हती. आता मात्र इतर सर्वच क्षेत्रांप्रमाणे कलेतही अफाट ज्ञान वाढले आहे. पूर्वीही गायक, नर्तक, लेखक हे तसे कलाकार म्हणून जगत असतच. विशेषतः राजाश्रय असला की हे सहज शक्य होई. आता मात्र ते सहज शक्य झाले आहे. पूर्वीचे कलावंत ब्राह्मण जाणिवेची मागणी किंवा क्षत्रिय जाणिवेची मागणी पुरवत. आताही बरेचसे कलावंत वैश्य जाणिवेची मागणी पुरवत आहेत आणि ह्या कलावंतांना व्यावसायिक कलावंत म्हटले जाते. मला गंमत वाटते ती अशी की अलीकडे व्यावसायिक चित्रपट दिग्दर्शक, व्यावसायिक चित्रकार, व्यावसायिक गायक, अभिनेते ह्यांना आपण सहजपणे स्वीकारतो; पण व्यावसायिक लेखक म्हटले की मात्र आपल्या भुवया उंचावतात. वास्तविक आपण ती गोष्ट सहजपणे स्वीकारायला हवी. पूर्वीचे प्राचीन काळचे सर्व लोककलावंत हे तद्दन व्यावसायिकच होते. सुभाष घई, अमिताभ बच्चन आणि गोंधळी ह्या तिघांच्यातही तसा काडीचा फरक नाही. तिघेही समाजाला जे हवे तेच पुरवत आहेत. फक्त गोंधळी जे करत असे त्यावर त्याचा **थोडा** का होईना पण विश्वास होता. त्याच्या कलेतील मूल्यावर त्याचा विश्वास होता; कारण स्वतंत्र विचार करण्याइतपत त्याचा समाजाविषयीच्या विचारात व्यक्तिगतता शिरली नव्हती. वैश्य समाजात ही व्यक्तिगतता शिरली आणि विघटनाला सुरुवात झाली. मग अमिताभ बच्चनला आपण पडद्यावर जे करतोय ते पटत नसले तरी ते करण्याचे स्वातंत्र्य मिळाले. इथे त्याची व्यक्तिगत जाणीव आणि कला ह्यांच्यात पूर्ण फारकत झाली.

**वैश्य जाणिवेत व्यक्तिमत्त्वाच्या ह्या दुभंगलेपणाला तोंड देणे आज प्रत्येकाबाबत घडत आहे**. त्याला व्यक्तिगत पातळीवर जे करावेसे वाटते ते आणि प्रत्यक्ष समाजात त्याला करावे लागते ते ह्यांच्यात प्रचंड अंतराचा पडदा आहे आणि त्यातून मानसिक छिन्नविछिन्नतेला त्याला तोंड द्यावे लागते आहे. ह्याला जबाबदार जितकी आपली शिक्षणपद्धती व समाजव्यवस्था आहे तितक्याच व्यक्तीचे भय, सुरक्षिततेची आस, सर्व आरामांची त्याला झालेली सवय, आळस, कमी कष्टात जादा उपभोग घेण्याची लालसा इत्यादी गोष्टी जबाबदार आहेत. आपली शिक्षणपद्धती व्यक्तिला जोपर्यंत तुला आवडेल तेच कर आणि त्यावरच जग आणि त्यावर जगता येत नसेल तर उपाशी राहा अशी शिकवण व निर्भयता व्यक्तिमत्त्वात पुरवत नाही तोपर्यंत ह्या दुभंगलेपणाला तोंड द्यावे लागणे अटळ आहे. आजचा कलावंत व लेखक ज्या तडजोडी करतो त्याच्यामागे त्याचे हे दुभंगलेपण आहे. त्याला ज्या कलेवर जगायचे असते ती त्याला त्याच्या पद्धतीने पेश करून त्याचे पोट भरेल याची कसलीही हमी (विशेषतः तिसऱ्या जगात) नसल्याने तो समाजाला मानवेल अशी कलाकृती निर्माण करण्यात गढला आहे. पूर्वी समाजाची मागणी आणि कलावंताची

कलाकृतीची संकल्पना ह्यात एवढा अंतराय नव्हता; कारण समाजापेक्षा कलावंत वेगळा नव्हताच. त्यामुळे त्याची कलेविषयीची धारणा व समाजाची मागणी एकच असे. आता मात्र व्यक्तिगततेमुळे हा अंतराय निर्माण झाला आहे. (भारतात तर हा अंतराय प्रचंडच आहे. आपला समाज मध्ययुगीन संकल्पनातच अद्याप जगतो आहे आणि त्याच्या भोवतालचे जग मात्र वैश्य समाजप्रधान झालेले आहे. त्यामुळे समाजाची मागणी आणि कलावंताची कलाधारणा ह्यांच्यात प्रचंड तफावत पडलेली दिसते.) अशा वेळेला कलावंताला पाच पर्याय उरतात. **पहिला** आपणाला हवी तशी कलानिर्मिती करत जगायचे आणि कलाकृती विकायची. जर विकली गेली नाही तर उपाशी मरायचे किंवा पूर्वी संन्याशी लोक जसे भिक्षा मागत जगायचे तसे जगायचे. आपल्याकडे मनोहर ओकने हा पर्याय राबवून दाखवला आहे. **दुसरा** समाजाला हवी तशी कलाकृती निर्माण करायची आणि पोट भरायचे. आनंद बक्षी, इंदिवर, ग. दि. माडगूळकर, सुहास शिरवळकर, गुरुनाथ नाईक वगैरेंनी हा पर्याय निवडला. **तिसरा** समाजाला हवी तशी आणि आपणाला हवी तशी यांचे मिश्रण करून कलाकृती निर्माण करायची. ह्या लोकांना एकाचवेळी पोटही भरायचे असते आणि कलात्मक निर्मितीचा आनंद वगैरेही हवा असतो. उदा. चि. त्र्यं. खानोलकर, राजकपूर. हा पर्याय सर्वात वाईट आहे आणि मराठीतील बऱ्याच जणांनी हा निवडलेला दिसतो. **चौथा** काही कलाकृती समाजाला हव्या तशा निर्माण करायच्या व त्यांच्या साहाय्याने पोट भरायचे व फावल्या वेळात आपल्याला हव्या तशा कलाकृती निर्माण करायच्या. उदा. गुरुदत्त याने बाजी, सी.आय.डी. सारखे तद्दन व्यवसायिक चित्रपट दिले. तर नंतर तेच पैसे वापरून स्वतःला हवे तसे चित्रपट काढले. त्याही चित्रपटात त्याने गाणी घालून तडजोड केलीय. अनेक चित्रकार आज हा मार्ग अवलंबताना दिसतात. **पाचवा** पर्याय समाजाच्या मागणीप्रमाणे एखादा जॉब किंवा धंदा करायचा आणि उरलेल्या वेळात स्वतःला हवी तशी कलाकृतीची निर्मिती करायची. भालचंद्र नेमाडे, चंद्रकांत पाटील वगैरेंनी हा पर्याय निवडलेला दिसतो. नेमाडे लेखकाने सवलती उपटू नयेत असे सुचवतात पण लेखकाने मानधन घ्यावे की नाही ह्याविषयी मौन पाळतात. माझ्या मते **लेखकाने मानधन घ्यावे** पण लेखक म्हणून प्रमोशन मिळवणे, कामांना दांडी मारणे, कामाच्या वेळात कलानिर्मिती करणे ह्या सारख्या सवलती मात्र उपटू नयेत. लेखकाने मानधन एवढ्यासाठीच घ्यावे की त्याचा ग्रंथ हा शेवटी एक क्रयवस्तू बनलेला असतो आणि प्रकाशक ती विकून पैसे मिळवतो. अशा वेळी प्रकाशकाने पैसे कमवावे आणि लेखकाने मात्र मानधन घेऊ नये असे म्हणणे मूर्खपणाचे होईल. मात्र पैशासाठी लेखन पहिला व पाचवा पर्याय स्वीकारणाऱ्या लेखकाने करू नये.

आता प्रश्न असा निर्माण होतो की, जे लोक समाजाला हवी तशी सेवा पुरवून आपली

सामाजिक जबाबदारी पार पाडतात आणि इतर वेळात लेखन करतात, त्यांच्या निर्मितीवर समाजाचा नैतिक अधिकार असतो काय ? माझे स्पष्ट उत्तर नाही असे आहे. म्हणूनच पु. शि. रेग्यांना त्यांनी प्राध्यापकीचा व्यवसाय पार पाडून नंतर कलावादी भूमिकेतून लेखन करायचा पूर्ण हक्क पोहोचतो. ह्याउलट खानोलकरांनी मात्र कामाबाबत जे बेजबाबदार वर्तने केले त्याबद्दल त्यांना जाब विचारण्याचा अधिकारही आपणाला पोहोचतो. खानोलकर कामावर असताना आपण लेखन करून जणू समाजावर उपकारच करतो अशा थाटात बिनधास्त दांड्या मारायचे. आज खानोलकरांचे फॅन्स त्यांचे ह्याबाबत समर्थन करतात. त्याला कसलाही नैतिक कणा नाही. खानोलकरांनी नंतर पूर्णवेळ लेखन स्वीकारून आपली नैतिक भूमिका सिद्ध केली असे मला वाटते. त्यांनी जगण्याचा तिसरा पर्याय निवडला आणि मग त्यानंतर त्यांची जी कुतरओढ झाली ती मराठीतील एक करुण शोकांतीका आहे. पहिल्या आणि तिसऱ्या पर्यायात भटकणाऱ्या या कलावंताला ह्या समाजात स्वास्थ्य मिळणे शक्य नव्हते; पण म्हणून त्यांचे आधीचे वागणे समर्थनीय मानता येत नाही. असो. तर प्रश्न असा की, सामाजिक जबाबदारी पार पाडून जे लेखन करतात त्यांचे काय ? नेमाडे हे समूहमनाचा भाग असावेत असे म्हणतात, मला वाटते हे शक्य नाही. वैश्य समाजात अशा कलावंताच्या जाणिवेत त्याची व्यक्तिगतता शिरणे अटळ आहे आणि म्हणूनच मी मागे म्हटले की संस्काराणाच्या प्रक्रियेतून येणारी सामाजिक बांधिलकी हीच अशा कलावंताची सामाजिक बांधिलकी असते आणि ती व्यक्तिगत सामाजिक बांधिलकी असते. हे गाणे प्रथम त्याचे असते आणि नंतर त्याच्यात नांदणाऱ्या समाजाचे असते. नेमाडे गृहीत धरतात तसे प्रथम समाजाचे नंतर त्याचे नसते. ह्यामुळेच असा कलावंत समाजाबाबत आपली भूमिका अधिक जबाबदारीने पार पाडू शकतो. कारण त्याला हवी ती मूल्ये तो त्याच्या लेखनातून मांडू शकतो आणि ही मूल्ये समाजाला मान्य नसली तरी समाजाला ती ऐकून घ्यावी लागतात. एकप्रकारचा नैतिक कणा त्याला प्राप्त होतो. (वाङ्मायच्या इतिहासातला सर्वांत मोठा विरोधाभास म्हणजे कम्युनिस्ट राजवटी आणि लेखक ह्यांचे संबंध ! लेखकाने समाजाच्या मागणीप्रमाणे पुरवठा केला पाहिजे ह्या भांडवलशाही तत्त्वाचा सर्वांत जास्त हिरिरीने प्रचार केला तो कम्युनिस्टांनी आणि लेखकाला मागणीप्रमाणे पुरवठा क रायला भाग पाडले.) हा कणा समाजाबाबत अधिक.मानवतावादी व आधुनिक मूल्ये मांडायला त्याला स्वातंत्र्य देतो. थोडक्यात, समाजाच्या मागणीपासून मुक्त असल्यानेच असा कलावंत समाजाबाबत अधिक चांगली भूमिका पार पाडू शकतो. नेमाडे स्वतःच त्याचे उत्तम उदाहरण आहे.

नेमाडे पुढे म्हणतात, *''वाङ्मयीन वातावरणातून सामाजिक संदर्भ साहित्य प्रक्रियेत झिरपत*

*असतात. ह्या सामाजिक संदर्भाचे प्रत्यक्ष अप्रत्यक्षरीत्या साहित्यनिर्मितीवर तिच्या गर्भावस्थेपासून परिणाम होत असतात. त्यामुळे लेखकाला इतर सर्व सामाजिक घटकांपासून संस्थांकडून आपोआपच साहित्यकृतीचे स्वप्न शोधून घेता येते. एका दृष्टीने त्याची निर्मिती म्हणजे या सर्व घटकांना संवेदनाच्या पातळीवर सामावून घेणेचे ठरले. साहित्यकृतीचा आशय व रूप भाषेत मांडणारी शैलीसुद्धा एक सामाजिक तत्त्व असून त्या त्या काळात रूढ असलेल्या सामाजिक शैलीतूनच लेखकाला आपले निवेदन मांडावे लागते. त्यामुळे आपोआपच साहित्यकृतीतील वैयक्तिक व्यक्तिकेंद्रित तत्त्व सार्वजनिक होत असते. सारांश, साहित्यात आशय शैलीरूप माध्यम ह्या सर्वच घटकांना सामाजिक संदर्भ मोठ्या प्रमाणावर असतात हे मान्य करावे लागते, त्यामुळे त्या संदर्भाशी इमान राखणे साहित्यिकाला स्वाभाविकपणे भाग पडते."*

समाजाबाबत एक गोष्ट इथे प्रथम स्पष्ट केली पाहिजे त्याशिवाय नेमाडेंचे वरील मत नीट तपासता येणार नाही. **समाज आणि व्यक्ती** ह्यांचा संबंध सरळसरळ **गिव्ह ॲण्ड टेक** ह्या स्वरूपाचा असतो. कुठलाही समाज व्यक्तीवर कधीच उपकार करत नाही. समाज जे देतो त्याची पुरेपूर किंमत त्या व्यक्तीकडून वसूल करतो. कदाचित संन्यासी ह्याला अपवाद ठरू शकतील. पण एरव्ही समाजाचा व्यवहार हा रोखठोक असतो. आता काहीजण हा व्यवहार व्यवहारासारखाच करतात तर काहीजण आदराने घेतात आणि प्रेमाने देतात. ह्यात म. फुले, आगरकरांसारखे लेखक घेतात कमी, देतात जास्त, तर अलीकडचे राजकारणी देत काहीच नाहीत पण घेतात खूप. चोर, डाकू आणि राजकारणी या तीन जमाती नेहमीच काही न देता कमावण्याच्या बेतात असतात. माणूस समाजाला घेण्याच्या बदल्यात पुरेपूर देत असतो. अलीकडे समाजात व्यक्तीने एक गरज भागवावी त्याबदली समाजाने त्याच्या इतर गरजा भागवाव्यात असा व्यवहार बदललेला दिसतो. लेखकही समाजाची गरज भागवत असतो आणि त्याबदली समाज त्याला मानधन देत असतो. काही लेखक समाजाची गरज भागवायला नकार देतात. त्यामुळे साहजिकच त्यांची पुस्तके खपत नाहीत आणि त्यांना मानधन मिळत नाही. हे लेखक स्वतःला हवी तशी निर्मिती करतात. म. फुले, आगरकर यांसारख्या समाजसुधारकासारखे हे कार्य असते. समाजसुधारकांच्या कार्याला मागणी नसते. म्हणूनच त्यांना उपेक्षा सहन करावी लागते. मात्र ते मेल्यानंतर किंवा उत्तरार्धात त्यांच्या कार्याची समाजातील मागणी वाढते आणि आपण ह्या लोकांना त्याबदली काही देऊ शकत नाही हे समाजाच्या लक्षात येते आणि मग समाज त्यांची इतिहासात महापुरुष अशी नोंद करून त्यांना अमर करण्यासाठी त्यांचे पुतळे, स्मारके वगैरे उभे करून त्यांनी जे दिले त्याची फेड करू बघतो. म्हणजेच **समाज कुणावरही उपकार करत नाही. व्यक्ती मात्र समाजावर**

उपकार करू शकते. ती समाजाच्या मागणीपेक्षा अधिक काम करते आणि त्याचा मोबदला न घेता निरपेक्ष राहू शकते. नेमाडे, चित्रे यांचे साहित्य हा त्यांनी समाजावर केलेला उपकारच म्हटला पाहिजे. कारण अद्याप तरी त्यांच्या कार्याची फेड समाजाने केलेली नाही. हा देण्याघेण्याचाच एक भाग असतो. सूर, रंग, रेघा, भाषा वगैरेंचे संक्रमण मागील पिढीकडून कलावंत घेतो आणि पुढच्या पिढीला संक्रमित करून त्याची फेड करतो. आशय, शैली, रूप ह्याबाबतही हेच म्हणता येईल. नेमाडेंच्या लिखाणावरून समाज हे सगळे देऊन कलावंतावर उपकारच करतो असा सूर लागलेला दिसतो. प्रत्यक्षात समाज काही उपकार म्हणून ह्या गोष्टी देत नाही. तो आपले ज्ञान संक्रमित करतो आणि व्यक्ती ते पुढच्या पिढीला संक्रमित करून त्याची फेड करते.

दुसरा मुद्दा थोडासा विज्ञानाच्या पार्श्वभूमीवर समजून घेऊ. विज्ञानाचा इतिहास एक गोष्ट सांगतो न्यूटन झाला नसता तर आईन्स्टाईनही झाला नसता. विज्ञानातले सर्व ज्ञान हे नेहमीच मागील पिढीच्या खांद्यावर उभे असते. मागील शास्त्रज्ञांची कार्ये, प्रमेये, ज्ञान ह्यांवरच पुढील शास्त्रज्ञ आपले संशोधन उभे करतात. कलेतही हीच बाब असते. मागील कलावंतानी केलेल्या कामावरच पुढील कलावंत उभे राहतात. विज्ञानाचे वातावरण जसे वैज्ञानिक संस्था, वैचारिक ज्ञान, वैज्ञानिक प्रयोगशाळा, वैज्ञानिक ग्रंथ, त्यांना पैसे पुरवणाऱ्या अर्थसंस्था ह्यांनी गजबजलेले असते तसेच कलेचे वातावरण कलावंत, कलेच्या संस्था, कलाज्ञान, कलेच्या शाळा, कलाग्रंथ, प्रकाशक, वितरक, संपादक, समीक्षक ह्यांनी गजबजलेले असते. ह्यातूनच मागील पिढीतील सर्व संस्कारक तपशील वैज्ञानिक किंवा कलावंत शोषून घेतो; मात्र खरा वैज्ञानिक व कलावंत इथेच थांबत नाही. तो त्यात स्वत:च्या प्रतिभेच्या जिवावर भर टाकतो. ते त्याचे वैयक्तिक योगदान असते. समाजाला त्याची गरज वाटली तर समाज ते संशोधन वा कलाकृती स्वीकारतो, नाहीतर कचऱ्याच्या पेटीत फेकून देतो. इथेही समाज त्यांची **उपयुक्तताच** बघतो. तेव्हा नेमाडे म्हणतात तसे, संस्कारकांशी इमान राखण्याची गरज नाही; मात्र त्यांचा मन:पूर्वक स्वीकार मात्र करावा आणि पुढे वाटचाल करावी. पूर्वी हे संस्कारक फक्त देशीच होते; कारण दळणवळणाची साधने मर्यादित होती. अलीकडे मात्र ते आंतरराष्ट्रीय झालेले आहेत. आज कलावंत केवळ स्वत:च्याच नव्हे तर जगाच्या कलाकृतींच्या खांद्यावर उभा असतो; मात्र ह्या संस्कारकातून त्याला व्यक्त व्हावे लागते असे नाही. नेमाडेंचे त्याच्या काळात रूढ असलेल्या सामाजिक शैलीतूनच लेखकाला आपले निवेदन मांडावे लागते हे मत मात्र सपशेल चुकीचे आहे. त्याच्याजवळ सांगण्यासाठी नवीन असेल तर त्याला रूढ शैली बदलावी लागते. आईन्स्टाईनच्या सिध्दांतात $E = mc^2$ मध्ये कदाचित E = Energy हे समाजाने दिले असेल, पण ते समीकरण काही समाजाने दिलेले

नाही. ते आईन्स्टाईनने शोधले आहे. इथे हे E = Energy महत्वाचे आहे. पण त्यापेक्षा आईन्स्टाईनची मांडणी अधिक क्रांतिकारक आहे. तेव्हा व्यक्तीच समाजाला योगदान देत असते हे आपण लक्षात ठेवावे. समाज केवळ दान देत असतो. ज्ञान घेत असतो. हे ज्ञान किंवा दान देखील मागील पिढीतील मूठभर प्रतिभावंतांची निर्मिती असते आणि समाजाला ती उपकारक वाटली म्हणून समाजाने ती स्वीकारलेली असते. तेव्हा सर्वांत मूल्यवान गोष्ट व्यक्तीच असते. समाज व्यक्तीपासून सुरू होतो आणि व्यक्तिपाशीच संपतो.

मागील पिढीतील ज्ञान पुढील पिढीत विकृत पद्धतीने पोहोचले तर मात्र घोटाळे माजू शकतात. कलाक्षेत्रात मागील पिढीच्या खांद्यावरून ज्ञान घेऊन नवीन कलाकृती निर्माण करताना स्वत:चे इमान विसरणारे कलावंत असतात. ते स्वत:च्या ऐषआरामासाठी स्वत:चा जीवनानुभव खुंटीला टांगून ठेवतात, हे म्हणजे वैज्ञानिकांनी शस्त्रास्त्रे तयार करण्यासारखे असते. त्यांना ह्या शस्त्रांनी माणसे मारली जाणार हे माहीत असूनही केवळ स्वत:च्या ऐषआरामासाठी शस्त्रास्त्रे तयार करावीशी वाटतात, तसेच काही लेखक समाजातील मागणीचा अचूक फायदा घेऊन अत्यंत बाजारू लेखन करतात. शस्त्रे तयार करणे ही जशी त्या समाजाची गरज असते तसेच अशा प्रकारचे साहित्य ही समाजाची गरज असते. हे लेखक ती गरज भागवतात. इथे लेखक काय किंवा वैज्ञानिक काय दोघांनीही आपली मानवता खुंटीला टांगून ठेवलेली असते आणि त्यांना ती खुंटीला टांगायला मदत करण्यात त्या समाजाचाच वाटा असतो. हा समाजच त्यांना अर्थपुरवठा करत असतो. नेमाडे म्हणतात तसे समाजाने दिलेल्या लेखनस्वातंत्र्याचा हा गैरफायदा अजिबात नसतो. उलट समाजाचाच ह्या गोष्टींना पाठिंबा असतो. वैज्ञानिक किंवा लेखक ह्या दोघांची जी सामाजिक बांधिलकीपासून नाळ तुटते त्याला त्यांच्याइतकाच समाजही जबाबदार असतो. नेमाडे ही जबाबदारी समाजावर टाकत नाहीत ही त्यांची गंभीर गफलत आहे. लेखक ही सामाजिक बांधिलकी पाळत नाही म्हणून राजकीय व सामाजिक संस्थांकडून सेन्सारशिपची मागणी येते हे नेमाडेंचे मत बालीश आणि भोळसट आहे. लेखक सामाजिक बांधिलकी पाळत नाही म्हणून सेन्सॉरशिप आल्याचे उदाहरण माझ्या तरी पाहण्यात नाही. उलट लेखक जेव्हा समाजाला मान्य नसलेली पण समाजाच्या प्रगतीसाठी आवश्यक असलेली मूल्ये घेऊन लिखाण करतो तेव्हा हमखास ज्या लोकांच्या हितसंबंधांना लेखकाच्या भूमिकेमुळे धक्का लागणार आहे असे लोक एकत्र येऊन आरडाओरडा करून सेन्सॉरशिपची मागणी.करतात. सलमान रशदी व तसलिमा नसरीन ही अलीकडील उदाहरणे हे मत सिद्ध करण्यास पुरेशी आहेत.

'मराठी साहित्य आणि आधुनिकीकरण' ह्या निबंधात नेमाडेंनी मांडलेल्या जवळ जवळ

सर्वच मतांशी मी सहमत आहे; मात्र ही आधुनिकता पाश्चात्त्यांची नसून वैश्य जाणीव व वैश्यमूल्ये ह्यांची आहे. ह्या संदर्भातील विवेचन मी पूर्वी केलेले आहे. त्याहून काही वेगळे सांगावे असे मला वाटत नाही. एक गोष्ट मात्र इथे सांगावीशी वाटते ती म्हणजे रोमॅण्टिसिझम म्हणजे डेकार्ट आणि न्यूटन यांच्या यंत्रवादी कार्टेशियन संदर्भ चौकटीविरूध्द केलेला उठाव होता. आपल्याकडच्या लोकांनी यंत्रयुग अस्तित्वात येण्याआधीच रोमॅन्टिसिझम उचलला आणि त्यांचे पाय सुटले. आपल्याकडचा रोमॅन्टिसिझम पाश्चात्त्यांच्या रोमॅन्टिसिझमशी जोडून पाहण्यापेक्षा आपल्याकडच्या पंडित, आख्यानक, शाहिर वाङ्:मयाशीही जरा जोडून पाहणे आवश्यक आहे. हा रोमॅन्टिसिझम आपला साहित्यिकांच्या आयुष्यातून फुलण्याऐवजी पुस्तकातून फुललेला दिसतो. पुस्तकातून फुललेले गुलाब कागदीच निपजणार हे उघड होते, तसे ते निपजले. केशवसुत वगैरेनां आधुनिकता ही चीज कळलेली असावी असे त्यांच्या अडाणी उसनवारीतून फुललेल्या कवितांतून तरी वाटत नाही. ह. ना. आपटेंच्या कादंबऱ्या आणि श्रीधर कवीचे पांडवप्रतापासारखे ग्रंथ ह्यात फारसा फरक नाही. दुसरी गोष्ट पाश्चात्त्य देशांत यंत्रयुग, तंत्रज्ञान, यांचा काहीसा उपहासच पाश्चात्त्यांनी केला; कारण त्यांच्यामुळे एक समाजाची सर्वकाळ पोलादी पकड निर्माण झाली. त्याविरुध्द अस्तित्व शाबूत ठेवण्याची धडपड म्हणजे साहित्य बनले. आपल्याला क्षत्रिय जाणिवेतून वैश्य जाणिवेत प्रवेश करण्याऱ्या आपल्या समाजाच्या मानसिकतेचे आकलन अद्याप स्पष्ट झालेले दिसत नाही. पाश्चात्त्यांना निरर्थकता, व्यस्तता, कंटाळा ह्या गोष्टींचा आयुष्यात जो शोध लागला त्याला कारण त्यांच्या अडाणी धर्मसंकल्पना आहेत. कयामत, कयामतीला मुडदे उखाडले जाणे, पाप, पुण्य, देवदूत, ईश्वर हा निर्माता असणे ह्यातून विश्व म्हणजे जणू एक राज्य (State) आहे. ईश्वर हा राजा, देवदूत हा मंत्री, पाप हा गुन्हा, पुण्य म्हणजे सत्कृत्य, स्वर्ग म्हणजे सत्कृत्याचे बक्षिस तर नरक म्हणजे पापाचे शासन ह्या अडाणी धर्मसंकल्पनांनी तिथे एक क्रॉंक्रिट स्ट्रक्चर निर्माण केले आणि विज्ञानाने त्याला हात लावताच ते धाडकन कोसळले. त्यामुळे त्यांच्या अस्तित्वाचा, नैतिकतेचा आधारच नष्ट झाला. मार्क्सने ह्या स्ट्रक्चरला रिप्लेसमेंट म्हणून समाज म्हणजे गॉड, कम्युनिस्ट राजवट म्हणजे ईश्वराचे राज्य अशी क्षत्रिय संकल्पना मांडली. त्यामुळे त्याचा पर्याय फाफलला. ह्यातूनच एक प्रचंड फ्रस्ट्रेशन झाले. रिकाम्या वेळेचे काय करायचे हे पाश्चात्त्यांना कधीच कळले नाही. परिणामी बेकेटसारखे लोक कंटाळ्यावर नाटक लिहू शकले. आपल्याकडे God हा Creater नाही तो being आहे. तो एकाचवेळी Creater आणि Creation आहे. तो नृत्यकारासारखा आहे. नर्तकापासून नृत्य वेगळे काढता येत नाही. विश्वाचे स्वरूप तसेच आहे. ते एकाचवेळी नर्तक आणि नृत्य आहे. पाश्चात्त्यांचा God हा चित्रकार

आहे. त्याने विश्वाचे चित्र निर्माण केले आणि तो गायब झाला म्हणूनच नित्शे God is dead म्हणू शकला. आपल्याला तसे म्हणणे शक्य नाही. कारण God, being, creation वेगळे नाहीत. दुसरी गोष्ट आपल्याकडे विश्व हा विचार नाही. Cosmose is thoughtless. त्यामुळे पाप-पुण्याचा गणिती हिशेब नाही. तुझ्या कर्माची फळे तुझ्याच झाडाला लागतील असा हा विचार आहे. शासन वगैरे देणारा कुणीच नाही आणि म्हणूनच मोक्ष देणारा पण कुणीच नाही. तुझ्या कर्माची बरी-वाईट फळे तुलाच भोगावी लागतील आणि मोक्ष पण तुलाच मिळवावा लागेल असा हा विचार आहे आणि त्याला सुरुंग लावणे विज्ञानाला शक्य नाही. तेव्हा पाश्यात्त्यांची परंपरा व आधुनिकता ह्याबाबत जी गोची झाली त्यातून जी व्यस्तता, निरर्थकता त्यांना सापडली ती आपल्या दृष्टीने फिजूल आहे. ज्याला त्याला आपला क्रूस वहावा लागतो असे पाश्चात्त्य म्हणतील. रजनीशांच्या भाषेत आम्ही - ज्याला त्याला आपली गिटार-सितार-बासरी वहावी लागते आणि ज्याला त्याला ती वाजवायला शिकावी लागते - असे म्हणू. ज्याला वाजवता येईल तो नाचेल. ज्याला वाजवता येणार नाही तो दु:खी होईल. रिकाम्या वेळेत काय करायचे ह्याचे पाश्चात्त्य उत्तर आपल्या अस्तित्वाचा क्रूस कंटाळवाणेपणे ओढायचा असे आहे, तर आमचे उत्तर आपली अस्तित्वाची बासरी वाजवायचा प्रयत्न करायचा आणि वाजली की आनंदाने नाचायचे असे आहे. तेव्हा आधुनिकता हा प्रश्न नाहीये. पूर्वी आम्ही पावा वाजवायचो. आता बासरी वाजवू. शेवटी वाजवणे महत्वाचे. हा मूलभूत फरक आम्ही जोपर्यंत ध्यानात घेत नाही तोपर्यंत आम्ही कामू काफ्काची मानसिक रुग्ण असणारी कादंबरीच आयात करू. त्याने ह्या देशाचे फार भले होईल असे मला वाटत नाही. आमचे दु:ख हे बासरी वाजण्याआधीचे दु:ख आहे. तुकारामाचा आकांत हा बासरी वाजण्यापूर्वीचा आकांत आहे आणि वाजल्यानंतर आमचा तुकारामही म्हणाला- आनंदाचे डोही आनंद तरंग. भारताला जगाला शिकवायचे आहे ते हेच! चित्रे, नेमाडेंच्या साहित्यावरून त्यांना हे कळलंय असे वाटत नाही; कारण त्यांची देशीयता शेवटी कितीही सांगितली तरी पाश्चात्त्यांकडूनच इकडे आलेली आहे.

